# अभिसारिका

(सामाजिक कादंबरी)

लेखक—नारायण धोंडो अुपाध्ये.

किंमत २-०-० ] [ ऑक्टोबर १९४०

# प्रस्तावना

सोलापूरचे [redacted] कादंबरीकार श्री. ना. धों. उपाध्ये यांच्या या नवीन कादंबरीला मी भीतभीतच प्रस्तावना लिहीत आहें. ते स्वतः कसलेले लेखक असून, त्यांच्या दोनचार ललित कृति यापूर्वीच वाचकांपुढें आलेल्या आहेत. तेव्हां त्यांच्यासारख्या ख्यातनाम लेखकाला प्रस्तावनेची खरोखरी काय गरज? दुसरें असें कीं, ज्या वैवाहिक प्रश्नावर ही कादंबरी श्री. उपाध्ये यांनीं लिहिली आहे, त्या प्रश्नाविषयीं मला अलिकडे एक प्रकारची अरुचि उत्पन्न झाली आहे. वैवाहिक प्रश्नाचें चर्वितचर्वण करण्याची इतकी कांहीं प्रवृत्ति मराठी ललित लेखकांत बोकाळली आहे कीं, आमचें ललित वाङ्मय पाहून, वैवाहिक जीवनाशिवाय दुसरा कोंणताहि महत्त्वाचा प्रश्न आज महाराष्ट्रापुढें नाहीं, असाच तिऱ्हाईताचा ग्रह होईल! अर्थात् श्री. उपाध्ये यांच्या या कादंबरीचा विषय मला आवडण्यासारखा नाहीं. त्यामुळें, त्यांच्या कादंबरीला प्रस्तावना लिहावयाला मन राजी नसतांनाहि, केवळ त्यांच्या मजविषयींच्या अकारण आत्मीयतेकडे लक्ष देऊन मी हे चार शब्द लिहीत आहें.

प्रस्तुत कादंबरीचा विषय जरी मला आवडण्यासारखा नसला, तरी श्री. उपाध्ये यांनीं तींत वैवाहिक प्रश्नाच्या निरनिराळ्या बाजू आणि त्यांची गुंतागुंत मोठ्या भावनोत्कट पद्धतीनें विशद केली आहे, हें लिहावयाला मला आनंद वाटतो. प्रीतिविवाह सध्यां रूढ होत असले, तरी ते सुखपर्यवसायी होतीलच असें नाहीं किंवा वैवाहिक प्रश्न प्रीतिविवाहानें सुटतील असेंहि नाहीं, अशी श्री. उपाध्ये यांची या कादंबरींतील वैचारिक भूमिका आहे; व ती अत्यंत समंजस आहे, यांत शंका नाहीं. प्रकाश आणि निशा यांचा दुःखपर्यवसायी प्रेमविवाह हा त्यांनीं या कादंबरींत उदाहरणादाखल घातला असून, कामवासना आणि प्रेमभावना यांच्यांतील फरक न कळल्यामुळें होणारी आत्मवंचना अत्यंत विदारक स्वरूपांत चित्रित केली आहे. पण, काम आणि प्रेम यांच्या

स्वरूपांतील फरक इतका कांहीं सूक्ष्म आणि तरल आहे कीं, शेलेसारख्या प्रतिभाशाली कवीच्याहि हातून, स्वतःची भावना नीट ओळखतां न आल्यामुळें, विवाहाच्या बाबतींत विलक्षण चूक झाली. इतर साऱ्या मानवी भावनांप्रमाणें प्रेमभावनासुद्धां चंचल आणि प्रमाथी आहे; श्री. उपाध्ये समजतात त्याप्रमाणें ती स्थिर किंवा सर्व काळ उदात्त राहणारी नाहीं. म्हणूनच प्रीतिविवाह हे पुष्कळदां अस्थिर आणि अनर्थकारक झाल्याचें प्रत्ययास येतें. प्रस्तुत कादंबरींतील प्रकाशचें विफल वैवाहिक जीवन हें प्रीतिविवाहाच्या भ्रामकतेचें एक हृदयंगम उदाहरण आहे.

प्रकाशच्या वैवाहिक जीवनाच्या रूपानें प्रीतिविवाहाची जी ही बाजू श्री. उपाध्ये यांनीं वाचकवर्गापुढें मांडली आहे, ती चिंतनीय असली, तरी त्यांच्या कादंबरींतील एकंदर वातावरण किंवा तिची रचना हीं असावींत तितकीं निर्दोष नाहींत. ही कादंबरी पात्रमुखी असल्यामुळें भावनेची उत्कटता तींत ओघानेंच आली आहे; पण त्या मानानें सहजता मात्र आलेली नाहीं. "माझं नांव पुरुषोत्तम ! मी मीनाक्षी खरे हिचा पति ! माझ्या नैराश्याची अन् वैगुण्याची कहाणी सांगायला मी तुम्हांपुढें उभा आहे," हा पांचव्या प्रकरणाचा प्रारंभ स्वाभाविक किंवा सरसहि वाटत नाहीं. श्री. उपाध्ये यांच्या भाषेंत भावनेचा जोष आहे; व त्यामुळेंच त्यांच्या कादंबऱ्यांतील वर्णनें मनाला चटका लावतात. पण, विचारांचा खोलपणा किंवा कथानकाचा रेखीवपणा हे गुण त्या प्रमाणांत नसल्यामुळें, त्यांची कादंबरी विस्कळित वाटते. एकादी घटना केवळ वास्तवतेमुळेंच वर्णनीय ठरते, असें नाहीं; तर कलात्मक आविष्काराला पात्र असण्याचा गुण ज्या प्रमाणांत त्या घटनेंत असेल, त्या प्रमाणांत ती वर्णनार्ह ठरते, हें श्री. उपाध्ये यांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

असो. उत्कट भावनावेश, ओघवती भाषा आणि हृदयंगम लेखनशैली हे तीन लालित्यपोषक गुण श्री. उपाध्ये यांच्या लेखणींत प्रकर्षानें आढळतात;

व त्या गुणांमुळेंच त्यांच्या कादंबऱ्या इतक्या चटकदार झाल्या आहेत. पण, या गुणांना कलात्मक दृष्टि, जीवनाचीं विविध रूपें न्याहाळण्याची प्रवृत्ति आणि विशाल ध्येयवाद यांची जोड मिळाल्याशिवाय त्यांच्या कादंबऱ्यांत खरें सौंदर्य आणि सामर्थ्य उत्पन्न होणार नाहीं. श्री. उपाध्ये यांच्या लेखणींत रस आणि रंजकता आहे. फक्त वैवाहिक प्रश्नांसारख्या रूढ विषयांच्या चाकोरींतून बाहेर पडून त्यांनीं जगांतल्या घडामोडींकडे डोळसपणानें पाहिलें पाहिजे. तशी इच्छा श्री. उपाध्ये यांना होऊन त्यांच्या हातून अधिक सामर्थ्यशाली ललित कृति निर्माण होवोत, अशी आशा व्यक्त करून मी ही प्रस्तावना संपवितों.

शान्तानिवास, नागपूर.
२०-९-४०

ग. त्र्यं. माडखोलकर.



माझे प्रेमळ परमपूज्य चुलते

**तीο अण्णासाहेब**

**ऊर्फ**

**गजानन भगवंत अुपाध्ये**

यांना प्रेमादरपूर्वक अर्पण.

**ना. धों. अुपाध्ये.**

## पुस्तक—

# हातांत देण्यापूर्वी

प्रथम हें सांगावयाचें आहे, कीं ज्यांना वैवाहिक सुख-दुःखाची जाणीव आहे अथवा तशी कल्पना करून घेण्याइतकी ज्यांची बुद्धि प्रौढ झाली आहे अशांनीं हें पुस्तक वाचावें. आणि यांतील वर्ण्य विषयासंबंधीं योग्य तो सारासार विचार करून, आपल्याला आपल्या वैवाहिक जीवनांत जास्तींत जास्त सुख कसें मिळेल हें शोधून ठरवून घ्यावें. व्यक्तीनें आपल्या जीवनांत सुधारणा केली, म्हणजे सर्व समाजाची सुधारणा होण्यास अवधी लागणार नाहीं हें उघड आहे. व्यक्ति ही समाजाची घटकच आहे. मानवी प्राण्याच्या सबंध आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा भाग जर कोणता असेल, तर तो वैवाहिक जीवनांतील ! कुठलीही विवाहपद्धति सदोष अथवा निर्दोष आहे हें सांगण्याचा माझा अधिकार नाहीं. तत्रापि व्यक्तीच्या वैवाहिक जीवनांत पतिपत्नी एकमेकांच्या सुखाला पूरक व्हावेत, मारक होऊं नयेत एवढें मला कळतें, व तें मी अट्टाहासानें सांगूं शकतों. एवढ्यासाठीं प्रथमतः प्रीति-विवाहाची पद्धति सर्रास रूढ व्हावी, कारण प्रीति ही अशी अद्भुत शक्ति आहे, कीं तीच दुसऱ्याच्या सुखासाठीं प्रसंगीं स्वतः त्रासदेखील सोसण्यास समर्थ असतें. या त्रासांतसुद्धां एक प्रकारचें अवर्णनीय सुख असतें. अर्थात् या सुखाची कल्पना ज्यांनीं प्रत्यक्ष या स्थितीचा अनुभव घेतला असेल त्यांनाच येईल.

प्रीतिविवाहाची पद्धति सर्रास रूढ झाली पाहिजे हें खरें; परंतु केवळ प्रीतिविवाहानेंच वैवाहिक जीवन सुखावह होईल अशी खात्री देतां नाहीं. कारण ‘ प्रीति–प्रीति ’ म्हणून आपण जिला म्हणतों, ती केवळ प्रीतीची थट्टा आहे–विटंबना आहे. ‘ प्रीति म्हणजे कामुकतेची परिणति ’ असा प्रीतीचा ओंगळ अर्थ आज सर्वत्र केला जात असल्याचें ऐकिवांत येत आहे. आणि या भावनेनें प्रस्फुरित झालेल्या विवाहालाच जर ‘ प्रीतिविवाह ’

म्हणावयाचें असेल, तर तो विवाह न झालेलाच बरा; कारण हा विवाह वैवाहिक जीवनाला सुखावह केव्हांही होऊं शकणार नाहीं. प्रीति ही उपभोगात्मक असतां उपयोगी नाहीं, तर त्यागात्मक-संयमात्मक असावी. थोडक्यांत, उदात्त भावनेनें प्रस्फुरित असावी. अशावेळीं सुखरूपी अमृताचा पेला अगदीं हातांत असल्यासारखेंच वाटेल यांत शंका नाहीं.

पहिल्यानें, प्रेम हें सौंदर्यावलंबी आहे हें कबूल केलेंच पाहिजे. शारिरिक सौंदर्याविना मन आकर्षिलें जाणेंच शक्य नाहीं. परंतु याचवेळीं शारिरिक सौंदर्याबरोबरच मानसिक सौंदर्याकडेही प्रेमिकांनीं जरूर लक्ष पुरवावें. मानसिक सौंदर्याचा ठाव घेतेवेळेची दृष्टि ही तिऱ्हाईत, निःपक्षपाती व न्यायी असावी. या दृष्टींतूनच उदात्तस्वरूपाचें प्रेम निर्माण होईल; आणि तेव्हांच मानवी प्राण्याच्या सुखाला खराखुरा प्रारंभ होईल. या उलट, मतलबी महत्त्वाकांक्षेनें, संकुचित स्वार्थानें आणि लैंगिक प्रेरणेनें जर दोन जीव एकत्र येतील तर त्यांच्या दुःखाला तेथूनच सुरवात होईल. आणि अंतीं त्याचे परिणाम घातकही होतील. हेंच दर्शविण्यासाठीं मी, या कादंबरींत कांहीं प्रसंग जास्त भडकतेनें आणि विदारकतेनें वर्णिले आहेत. मात्र जे वर्णिले आहेत ते खरेखुरे आहेत, वास्तवपूर्ण आहेत; कादंबरीला योग्य दिसेल तितकाच कल्पनेचा मालमसाला भरला आहे-इतकेंच ! ज्यांना वैवाहिक सुखदुःखाची कल्पना आली आहे वा तशी कल्पना येण्याइतकी ज्यांची बुद्धी प्रौढ झाली आहे त्यांच्या विचाराला, ही कादंबरी वाचून खात्रीनें चालना मिळेल. आणि म्हणूनच मी प्रथमच हें पुस्तक कोणी वाचावें हें सांगून टाकलें आहे. **ज्यांनीं हें पुस्तक वाचावें अशी माझी इच्छा आहे अशांवर मी, आजच्या वैवाहिक जीवनांतील दुःखांचा समूळ नायनाट करावा व भावी पिढीचा मार्ग जास्त सुलभ अन् सुखावह करावा अशी जबाबदारी लादीत आहें.**

आतां आभार मानावयाचे आहेत. प्रथमतः श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचे. पहिल्याच भेटींत त्यांना मी ' या पुस्तकासंबंधीं चार शब्द लिहून द्या ' अशी जी विनंति केली, तिचा स्वीकार करून, आपला अमूल्य वेळ खर्चून प्रस्तावना लिहून दिली आहे त्यांबद्दल मी त्यांचा ऋणी आहे! त्यानंतर रा. रा. दा. सां. यंदे यांचे! पुस्तकाचें प्रकाशन त्यांचेतर्फे व्हावयाचे होतें, परंतु मध्यंतरींच्या अडचणींमुळें तें होऊं शकलें नाहीं. तेव्हां दुसरीकडे प्रकाशन व्हावें यास्तव त्यांनीं परवानगी दिली, सद्रूत पुस्तकाला मर्यादित स्वरूप यावें म्हणून जी चर्चा केली त्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे शेवटीं, ज्यांच्या मेहनतीनें हें पुस्तक प्रसिद्ध झालेलें मी पाहातों आहें त्या, मुद्रक-प्रकाशक या उभयतांचे आभार मानलेच पाहिजेत. त्याबरोबरच रसिकांचेहि. कारण त्यांचे आभार मानले नाहींत तर......? पण ती ' जर-तर 'ची भाषाच नको!

' ज्ञानमंदिर' कार्यालय
मुंबई नं. ४.

सर्वांचा नम्र,
**ना. धों. अुपाध्ये.**

**ता. क.**—या कादंबरीवर श्री. गोविंद वल्लभपंत यांच्या एका हिंदी कादंबरीची ओझरती छाया पडली असल्याचें आज माझ्या निदर्शनास आलें आहे. हेतुपुरस्सर ही गोष्ट घडून आलेली नसली, तरी प्रसिद्ध होण्यापूर्वी निदर्शनास आल्यामुळें तिची कबूली देणें जरूर आहे.

**ना. धों. अु.**

३०-९-४०

# अभिसारिका



## प्रकरण १ लें

**इंदु–प्रकाश**

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

ती. दादांस सप्रेम साष्टांग नमस्कार :—

आपलें पत्र कालच मिळालें. वास्तविक मी कालच आपल्या पत्रास उत्तर लिहावयास हवें होतें, परंतु एका प्रख्यात कादंबरी-काराच्या नव्या कादंबरीच्या रॅपरसाठीं तीनरंगीं चित्र त्यांना कालच पुरें करून देणें भाग होतें, म्हणून तें शक्य झालें नाहीं. विलंब लावल्याबद्दल क्षमा असावी.

आत्तांपर्यंत माझें लग्न जुळविण्यासंबंधीं आपण अनेक वेळां प्रयत्न केला, परंतु प्रत्येक वेळीं माझ्या नकारानें आपणांस निराश व्हावें लागलें आहे.

शिक्षण पुरें झाल्याशिवाय अन् कुठें तरी धंद्याचा जम बसल्याशिवाय लग्न करणें मूर्खपणाचें होय, असें आजपर्यंतचें माझें म्हणणें होतें. आणि त्यास अनुसरून माझें शिक्षण पुरें होईपर्यंत आपणही लग्न जुळविण्याची विशेषशी खटपट केली नाहींत हें उत्तमच झालें.

आज मी इथें धंदा सुरू केला आहे, आणि तो चालतोही बरा! शाळेंत, तद्वतच कॉलेजांत असतांही मी नेहमीं चित्रें काढीत असे. माझ्या या चित्रांच्या हव्यासाकडे पाहून, मी चांगला निघणार नाहीं पुढील आयुष्यांत, असे उद्गार आपण कित्येक वेळीं काढलें आहेत हें मला आजही स्मरत आहे. पण आतां मात्र याबाबत आपण धन्योद्गार काढीत आहांत यांतच मला स्वतःला अभिमान वाटतो आहे.

या माझ्या '**प्रकाश आर्ट स्टुडिओ**'चा उद्‌घाटन समारंभ होऊन फक्त सहाच महिने झाले आहेत, पण एवढ्या अल्पावधींत माझ्या कामाचा पसारा इतका वाढला आहे, कीं मला सध्यां स्टुडिओच्या कामासाठीं दोन तरी आर्टिस्ट–('कलावंत.' हल्लीं मराठीचें शुद्धीकरण होते आहे ना? खरं सांगूं कां दादा; हें शुद्धीकरण म्हणजे काय हेंच मला स्वतःला समजत नाहीं पहा! जे शब्द रूढ होत आहेत आणि झाले आहेत ते आपल्या मातृभाषेंतून वापरतांना कानांना बोंचक लागणार नाहींत एवढी खबरदारी घेतली म्हणजे पुरें आहे. असो.)–ठेवणें भाग पडत आहे.

आतां हें आत्मप्रौढीचें पुराण पुरें करतों कारण मूळ मुद्दाच बाजूला राहिला. बाकी कांहीं असो, आत्मप्रौढी हें मूर्खपणाचें आहे असें मानण्यांत येत असलें, तरी तो मोह सहसा आवरला जात नाहीं.

“ आतां तुझा धंदा चांगला चालतो आहे, शिवाय तुझी मागील तक्रारही संपूर्णपणें लोपली आहे; मग आतां तूं लग्नाला तयार व्हावेंस हें उत्तम ! मी इथें चांगलं स्थळ शोधून काढलें आहे. मुलगी शिकलेली आहे. रूपानेंही बरी आहे. ” हा आपल्या पत्रांतला मुद्दा !

माझा धंदा चांगला चालतो ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पण म्हणून मी लग्नाला तयार व्हावेंच हा आपला आग्रह मात्र मला मान्य नाहीं. आपण स्थळ शोधून काढलेंत, मुलगी शिकलेली आणि रूपानेंही बरी आहे म्हणतां ! पण खरें आणि स्पष्ट सांगावयाचें म्हणजे शिक्षण आणि रूप या दोन्ही गोष्टी व्यक्तीचें वैवाहिक जीवनांत अमृताचा आस्वाद, शशीची शीतलता आणि सुमनांची शूचिता आणूं शकत नाहींत असं माझं प्रांजल मत आहे. वैवाहिक जीवनाला गोडवा अन् गारवा आणायचा झाल्यास वधूवरांचें एकमेकांवर प्रेम असलें पाहिजे.

या दृष्टीनें पाहतां तुम्हीं पाहिलेली अन् पसंत केलेली मुलगी माझ्या पुढील आयुष्यांत सुखाची हिरवळ निर्माण करण्यास आणि ती वृद्धिंगत करण्यास सदैव जागरूक राहीलच हें नक्की कशावरून ? आपल्या ब्राह्मण समाजांतील स्त्रिया खरोखरीच पतिनिष्ठ असतात हें

मला अक्षरशः कबूल आहे. पण केवळ पतिनिष्ठ असणें म्हणजे पतीला सुख देणें नव्हें.

( मी चित्रकार आहे. साहित्यिक नव्हे, कीं भाषाशास्त्रज्ञ नव्हे, तेव्हां 'पतिनिष्ठ' शब्दाचा अर्थ माझ्या कल्पनेप्रमाणें जाणावा. )

एकंदर विवेचनावरून मी प्रीतिविवाहाचा पुरस्कर्ता आहे हें समजून आलें असेलच.

आपण वयोवृद्ध–ज्ञानवृद्ध आहांत. मी लहानानें मर्यादा संभाळून वर्तणूक ठेवावी हेंच उत्तम !

मर्यादा कशाला म्हणतात हें मी थोडेंबहुत जाणतों, तेव्हां त्या दृष्टीनें पाहातां, मी पुढें जें लिहीतों आहे तें केवळ मनमोकळे करण्याच्या उद्देशानें. यांत मर्यादेचें उल्लंघन होतें आहे असें मात्र कृपाकरून समजून घेऊं नये ही विनंती.

"**मॉडेल**" ( आतां या शब्दाला मराठींत कोणता शब्द आहे बरें ? '**आदर्श**' ? कुणाला माहीत काय आहे तें ? '**दृश्य वस्तु**' म्हटल्यास बरें दिसेल ? ) मॉडेलसाठीं मी स्टुडिओंत निशा नांवाची महिना ७५ रुपये देऊन वीस वर्षांची तरुणी नोकरीवर ठेवली आहे. शिकलेली आहे आणि रूपानेही बरी–बरी कां ? उत्तम आहे. स्वभावानें फारच गोड आहे. तिच्यावर–तिच्यावर–अडखळूं कशाला ? हो, आहे माझें तिच्यावर प्रेम.

मी तिला याबाबत विचारलें नाहीं आणि तिनेंही पण तसें कांहीं दर्शविलें नाहीं.

तरी परंतु...समजलें असेलच एवढ्यावरून !

सध्यां यापेक्षां जास्त लिहीण्यासारखें कांहीं नाहीं. सर्वत्र वडील मंडळींस नमस्कार, लहानांस आशीर्वाद. पत्राचें उत्तर येईल अशी अपेक्षा आहे.

आपलाच

**प्रकाश.**

* * *

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

निशा—सप्रेम नमस्कार:—

तुला पत्र लिहीण्यासाठीं हातांत पेन घेऊन बसलों आहे. एक तास होऊन गेला तरी अद्यापि मी एकही ओळ लिहीली नाहीं. पत्राची सुरवात कशी करूं या विचारांतच हा सारा वेळ गेला अन् त्याबरोबरच सिगारेटचें एक पाकीटही खलास झालें. घड्याळांत एकाचा ठोका पडलेला ऐकला अन् लिहायचंच असा निश्चय करून या ओळी लिहील्या आहेत.

तूं आज तीन महिन्यांपासून माझ्याकडे नोकरीला आहेस. या एवढ्या अवधींत तुला माझा स्वभाव पूर्णपणें कळून आला असेलच! मला मात्र तुझा स्वभाव कळून आला आहे.

दिवाळीला अद्यापि दोन महिन्यांचा अवधी आहे. पण आत्तां-पासूनच मासिकांच्या संपादकांचा 'दिवाळी खास अंका'साठीं लागणाऱ्या चित्रांचा तगादा सुरूं आहे.

काल तें—" रंजन " मासिकाच्या खास अंकासाठीं सुरवात केलेलें, " **येउनि दारा आड घेतलें मी बुचड्यांतील फूल । दचकुनि वळतां तूं, आलिंगुनि तव हरिली भूल ॥** " या कवितेच्या आधारावर काढावयाचें चित्र अद्यापि पुरें झालें नाहीं. तें चित्र कांहींही झालें तरी आज संपविणेंच भाग आहे. सकाळीं तूं रजा मागितलीस, पण सध्यां इतकें काम आहे, कीं नाइलाजानें तुला नकार द्यावा लागत आहे. तुझ्याशिवाय इतर कुठलेंही मॉडेल मला पसंत पडणेंच शक्य नाहीं. तुझा कर्तव्यतत्पर स्वभाव अन् रेखीव पण डौलदार अंगयष्टी यावरच मीं खूष आहें.

हें सारं झालं स्टुडिओंतील कामासंबंधीं ! आतां जरा खाजगी अन् मनमोकळेपणीं लिहीतों.

रॉयल ऑपेरा हाऊसच्या कोपऱ्यावर मोटारींच्या गर्दीतून वाट काढतांना केळीच्या सालीवरून तुझा पाय घसरला, अन् तूं पडलीस. त्याचवेळीं मागें मी होतों म्हणून बरें झालें. पुढें धांवत येऊन तुला मागें खेंचून घेतां आलं मला, नाहींपेक्षां वेगानें येणाऱ्या मोटारीचा धक्का खात्रीनें लागला असता तुला अन् त्या योगानें इजाही झाली असती थोडीबहूत.

निशे, त्या अकस्मात टळलेल्या अपघाताच्या दिवसापासून माझं तुझ्यावर प्रेम बसलं आहे. आज हीच गोष्ट कळविण्यासाठीं मी पत्र लिहीत आहे. अशा स्थितींत मनाचा गोंधळ होणें साहजिकच आहे.

माझ्या पत्राचा आशय तुला कळेलच. पत्राचें उत्तर जरूर दे.

तुझा–( होऊं पाहाणारा )

**प्रकाश**

**ता. क.** :—'रंजन' चें चित्र पुरें करून उद्यां "ओलेति" चित्राची सुरवात करणें आहे, तेव्हां स्टुडिओंत आलेंच पाहिजे.

**प्रकाश**

* * *

शशिनिवास,
दादर–मुंबई.

श्री. रा. रा. प्रकाश–चालक 'प्रकाश आर्ट स्टुडिओ–'यांसी नमस्कार वि. वि. :—

सोबत नुक्तीच प्रसिद्ध झालेली माझी "हिरवळ" कादंबरी मी भेटीदाखल पाठवीत आहे.

सध्यां छपाई चालूं असलेल्या माझ्या नव्या कादंबरीच्या रॅपर-साठीं मला दुरंगी चित्राची आवश्यकता आहे. चित्राची कल्पना यावी यासाठीं त्या प्रसंगाचें वर्णन असलेलें हस्तलिखित पान पाठवीत आहे. चित्र उत्तम–आकर्षक असावें.

तारीख ५ रोजीं स्टुडिओंत येऊन मी चित्र घेऊन जाईन. कळावें.

**इंदुमती खरे.**

* * *

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

कुमारी इंदुमती खरे यांसी नमस्कार.

आपलें पत्र, प्रकाशित कादंबरीची प्रत आणि हस्तलिखित पान–सर्व कांहीं मिळालें. चित्राचें 'रेखन'–( स्केच ) तयार आहे. आपणांस पसंत आहे वा नाहीं. हें प्रत्यक्षच येऊन पाहावें आणि सांगावें. रेखन पाहून प्रत्यक्ष आज्ञा ( ऑर्डर ) दिल्याशिवाय चित्र हातीं घेतलें जाणार नाहीं. कळावें.

आपला
**प्रकाश**

* * *

**प्रकाशची रोजनिशी–**

रेखीव अवयव, डौलदार अंगयष्टी, हंसरा चेहरा आणि प्रसन्नवदना निशा ! रॉयल ऑपेरा हाऊसच्या कोपऱ्यावर मोटारीचा धक्का खात्रीनें लागला असता तिला, पण माझ्या चपळाईनें तो अपघात टळला. अपघात टळला ही गोष्ट खरी असली तरी आतां मात्र मला त्याबद्दल सारखें आश्चर्य वाटतें आहे. माझ्या अंगीं त्यावेळीं इतकी चपळाई अन् सावधानता आली तरी कोठून ?

मला शाबासकी देणारे, ते मोटारींत बसलेले सधन गृहस्थ–काय बरं नांव त्यांच ? हो आठवलं–पण जाऊं द्या ती नांवाची ती स्मृति.

निशेच्या नाजूक शरिराला मागें खेंचून तिचा सर्व भार माझ्या शरिरावर घेतला. तिच्या कांहींशा असावध अन् अस्ताव्यस्त

शरिराचा स्पर्श माझ्या शरिराला झाला, अन् त्या तशा स्थितींतही माझ्या सर्वांगावर शहारे आले.

त्यावेळीं ती बेशुद्धच होती. व्हिक्टोरिआंतून तिला घरीं पोहोंचवितांना वाटेंत ती शुद्धीवर आली अन् सकंप व सभय नजरेनें तिनें माझ्याकडे पाहिलं. तिचा 'हें काय ?' असें विचारण्याचा आशय असावा असें मी त्या नजरेवरून जाणलें अन् तत्क्षणीं "**अपघात**" असें म्हणालों.

सहजपणोंच "अपघात" असे शब्द माझ्या तोंडून बाहेर पडले खरे, पण तेवढ्यावरून मला एका सुंदर चित्राची कल्पना आली. तिला घरीं पोहोंचविली अन् तसाच स्टुडिओंत आलों. सारें साहित्य घेऊन चित्र काढायला बसलों. दोन दिवस लागले मला तें चित्र पुरें करायला ! आज पुरें झालें तें. त्या चित्राला "**अपघात**" हेंच नांव दिलं मी.

दुपारीं निशेनं पाहिलं तें "अपघात" चित्र. आणि त्याचवेळीं "इश्श" म्हणून माझ्याकडे तिरप्या मोहक नजरेनं पाहिलं.

त्यावेळची तिची ती नाचरी नजर अन् तिचा तो मोहक अविर्भाव—बस्स ! पुरुषांचे हृदयविच्छेद करणारें रमणीजवळील प्रखर शस्त्र तें हेंच याची खात्रीच झाली मला !

* * *

दुपारीं "ओलेति" चित्रासाठीं पोज् दिली मीं निशेला. सुंदरशी लहान घागर कंबरेवर किंचित् कलति धरून उभी राहा असं बजावलं. पांढरे शुभ्र पण ओलें पातळ तिला नेसायला दिलें होतें. तिच्या

गौरवर्ण अंगाला तें फारच खुलून दिसत होतें. प्रसन्न वदनानें अन् नाचऱ्या नजरेनें समोर पहा असंही मी बजावलं तिला.

**"सख्या रे भरुन नेते घागरी–"**

हें चरण आठवलें मला, तिची ती उभी राहण्याची ढब पाहून !

ओल्या पातळांतून दिसणारें तिचें तें सोत्कंठित मोहक सौंदर्य–कोंवळया उन्हांत केळीच्या खुंटांतला अगदीं आंतआंतला पापुद्रा धरला म्हणजे कसा दिसतो तस्संच दिसत होतं निशेचं ओल्या पातळाआडचं शरीर–! खरोखरीच विलोभनीय होतं तें सौंदर्य !

भुरळ पडली माझ्या मनाला; अन् आवेशानें तिच्याजवळ गेलों मी. मी घट्ट कवटाळून धरली तिला ! पण छे !—

त्या तशा स्थितींत राहण्याची तिची इच्छा नव्हती. पुरूरव्याच्या प्रेमपाशांतून निसटून जाणाऱ्या निर्दय उर्वशीप्रमाणेंच तीही तत्काळ बाजूला झाली माझ्यापासून आणि गेलीही लागलीच स्टुडिओंतून.

निशा–ओलेति ! निशा–ओलेति ! !

* * *

**इंदुमती खरेची रोजनिशी–**

चित्राचें स्केच पाहायला प्रकाशांच्याकडे 'प्रकाश आर्ट स्टुडिओ'त गेलें होतें सकाळीं. प्रकाशांची भेट झाली.

किती दिलदार स्वभावाचे आहेत प्रकाश ! आणि बोलतात तरी किती गोड ? प्रकाश ! ! !

चंद्रावलोकनानें सागराला भरती येते. माझं नांव इंदु ! इंदु म्हणजेच चंद्र–मग या इंदु दर्शनानें प्रकाशांच्या हृदयसागराला भरती येत असेल कां ?

प्रकाश ! ! !

इंदु–प्रकाश ! इंदु–प्रकाश ! !

इंदूचा प्रकाश केव्हांही स्वच्छ अन् शुभ्रच असायचा !

इंदू–प्रकाश ! इंदू–प्रकाश ! !



## प्रकरण २ रें

**निशा–प्रकाश**

मुरारजी पेठ,
सोलापूर.

प्रियमित्र प्रकाश यांस, सप्रेम नमस्कार वि. वि. :—

माझी रडकथा नित्याचीच आहे. ती वाचून माझ्या स्थितीबद्दल कांहींतरी सहानुभूतीनें तूं विचार करशील ही खात्री असल्यामुळेंच आज मीं पत्र पाठवीत आहें. बरेंच दिवसांत पत्र न पाठविल्यानें तूं कदाचित् माझ्यावर रागावलाही असशील. हल्लीं शाळेचें इन्स्पेक्शन सुरूं आहे. यावरून माझ्यामागें किती कामांचा लफडा आहे हें तूं जाणशीलच. तुझीं चार पत्रें आलीं, वाचलीं ! तुझें ठीक चाललें आहे हें वाचून आनंद वाटला. पत्र पाठविण्यास उशीर झाल्याबद्दल क्षमा असावी.

आई वडिलांवाचून लहानाचा मोठा झालेला मी! शिवाय सांपत्तिक दृष्ट्या गरीब! माझ्या आवडी-निवडीकडे कोण लक्ष देणार? अगदीं लहानपणापासून ते आत्तांपर्यंत क्षुल्लक वाटणारी-सुद्धां कोणतीही हौस पुरली नाहीं. आत्तांच मिळवूं लागलों आहे म्हणून हौसेखातर कपडे करतो एवढंच. एवंच, लहानपणापासूनच मी दुःखी आहे. जिथं क्षुल्लक बाबींतलीसुद्धां माझी हौस पुरविली गेली नाहीं, तिथं माझ्या लग्नाच्या बाबतींत तरी कशी पुरविली जाणार?

आई वडिलांच्या पश्चात् ममतेनें संभाळून मला मार्गाला लावलं, याच एका सद्भतूनें अन् कृतज्ञतेनें मी लग्नाला मान तुकविली, पण त्यामुळें माझ्या साऱ्या आयुष्याचा नाश झाला.

लग्नाआधीं माझं कुणावरही प्रेम नव्हतं. पण जिच्याशीं संसार करायचा, सबंध आयुष्य जिच्या सहवासांत घालवायचं-तिची थोडीशी तरी ओझरती माहिती असणं जरूर नव्हें का? मित्रा, फार दुःख होतंय् रे! पण करणार काय?

माझी बायको वेडी आहे, प्रत्यक्ष वेड ज्याला म्हणतां येईल तें वेड जरि तिला नसलं, तरी व्यवहारांतील कवडी इतकीही अक्कल तिला नाहीं हें खरें आहे. धोतर धुवायलासुद्धां तिला येत नाहीं, मग धोतरापेक्षां जास्त लांब रुंद असलेलीं लुगडीं-पातळं कशीं धुणार ती? बोलतांनाही मधून मधून बोबडं अन् तोतरं बोलते ती. रूपानेंही चांगली नाहीं. तिच्याकडे पाहिलं, कीं शिसारीच येते मला.

तिच्या माहेरकडून सालीना पांचशें रुपयांची इस्टेट मला मिळ-णार म्हणून हें ध्यान माझ्या गळ्यांत बांधले गेलें.

पण आतां मला कळून आलं, कीं पैसा हेंच सर्व सुखाचं साधन होऊं शकत नाहीं. पैसा नसला तरी चालेल, पण एखादी गोष्ट मनाप्रमाणें घडून आली, म्हणजे जें समाधान, जें सुख वाटतं तें इतरत्र कशांत वाटत असेल असं निदान मला तरी खास वाटत नाहीं. कधीं चुकूनही मी तिच्याकडे प्रणयी दृष्टीनें—किंवा समाधानाच्या नजरेनें पाहिलं नाहीं; मग पतिपत्नीच्या नात्याप्रमाणें इतर गोष्टी व्हायच्या दूरच राहिल्या.

असं हें माझं जीवन आहे.

विवाहित ब्रह्मचारी ज्याला म्हणतां येईल, असा मीच आहे ! मित्रा प्रकाशा, मी मनुष्यच आहे. पशूलासुद्धां वासना अन् विकार असतात, मग त्याच वासना अन् विकारांनीं माझ्या मनाची छळणूक केली तर त्यांत नवल तें काय ?

मी सध्यां ज्या वाड्यांत राहात आहे, त्या वाड्याची मालकीण तरूण स्त्री आहे. रूपानें फार उत्तमपैकीं आहे अशांतला कांहीं भाग नाहीं, पण कुरूपही नाहीं ती. मला जें सुख मिळत नाहीं, तें सुख तिलाही मिळत नसावं असा माझा दृढ समज आहे. मी विवाहित ब्रह्मचारी, तर ती सौभाग्यवती विधवा ! थोडक्यांत आम्ही दोघेही समदुःखी आहोंत पहा.

अलीकडे अलीकडे मी त्या स्त्रीकडे कांहींएका निराळ्याच दृष्टीनें पाहतो आहे. तिच्याकडे पाहातांना माझ्या नजरेंत अशी कांहीं चमक निर्माण होते, कीं पुढें माझी मलाच शरम वाटूं लागते त्याबद्दल ! मी चुकत आहे, एका विवाहित स्त्रीकडे प्रणयी—अभिला-

षित नजरेनें पाहात आहे, हें अनैतिक कृत्य होत आहे आपल्या हांतून, याची जाणीव आहे माझ्या मनाला ! पण इतकं असूनही ती समोर आली म्हणजे दृष्टी चळते मित्रा ! तिच्याकडे पाहूंच नये असा माझ्या मनाचा निश्चय; पण मनाचा हा निश्चय मनांतल्या मनांतच राहातो, अन् मनाच्या विरुद्ध बेगुमानपणें शरिरांतल्या अवयवांचं कार्य सुरूं होतं.

सध्यां होत असलेल्या मनाच्या मुक्या वेदना थांबवायच्या असतील, तर त्यावर एकच उपाय आहे—लग्न—दुसरं लग्न !

या वाड्यांतून बिऱ्हाड बदलावं, आणि दूर कुठंतरी रहायला जावं असं फार फार वाटतं आहे पण...पण—???

जाऊं दे मित्रा, कितीही लिहीलं, तरी माझी रडकथा संपणार नाहीं. कितीही उगाळला म्हणून कोळशाचा काळा रंग पालटणार आहे थोडाच ?

कोणतीही गोष्ट तुझ्याजवळून छपवून ठेवावी असं वाटत नाहीं म्हणून हें इतक्या स्पष्ट अन् मोकळेपणानें लिहीलं आहे ! लिहीलं आहे एवढ्यावरून तुला माझ्या सध्यांच्या जीवनाची माहिती होईलच.

यापेक्षां जास्त लिहीण्यासारखं असं कांहीं नाहीं, किंवा लिहीण्याची इच्छा नाहीं असं म्हण हवं तर !

तुझाच

**गुणवंत.**

* * *

मुरारजी पेठ,
सोलापूर.

कुमारी इंदुमतीस वडील बहिणीचा अनेक उत्तम आशीर्वाद:–

तुझी "हिरवळ" ही कादंबरी वाचली. मला फार फार आवडली ती. दुसऱ्या कादंबरीची छपाई चालू आहे असं तूं पत्रांत लिहीलंस; केव्हां प्रसिद्ध होणार ती कादंबरी ? नांव काय त्या कादंबरीचं ?

तुझ्या लेखनाची प्रगति पाहिली अन् तुझी प्रगल्भ बुद्धिमत्ता पाहिली म्हणजे शरमेनें खालीं मान घालावीशी वाटते. तुझ्या गुणाचं चांगलंस चीज होवो नी एक सुरेख, फक्कडसा नवरा तुला मिळो हाच माझा तुला आशीर्वाद.

आज तुला मी पत्र लिहायला बसलें आहे खरी, पण मनांत कसलं भयंकर विचारांच वातचक्र फिरूं लागलं आहे याची कल्पनाही न केलेली बरी. तूं माझ्यापेक्षां लहान असलीस तरी तुझं मन मोठं आहे. आणि म्हणूनच तुझ्याजवळ एकदां अंतःकरण खुलं करावं—साऱ्या दुःखाचा पाढा तुझ्यापुढें वाचून काढावा असं फार फार वाटूं लागलं आहे. बरेच दिवसांपासून मनांत घोळतं आहे हें. आज मात्र या पत्रांतून सारं सारं सांगून टाकणार आहे.

माझी हकीकत वाचून तुला नवी कादंबरी लिहायला चांगलासा विषयही मिळेल.

घरच्या सांपत्तिक दृष्टीनें आणि परिस्थितीनें विचार करतां मी सुखी आहे असं म्हणायला कांहींच प्रत्यवाय नाहीं. पण एका सुखाची उणीव माझ्या मनाला भासते आहे. तूं माझ्यावर विश्वास

ठेवणार नाहींस. तुला खरंसुद्धां वाटणार नाहीं, पण स्पष्टच सांगायचं ठरविलं आहे, तेव्हां विश्वास वाटो वा न वाटो, कांहीं एक न दडवितां सारं कांहीं सांगतेच.

स्त्रियांना ज्या सुखाची आवश्यकता भासते, त्या सुखाचा अभाव माझ्या मनाला जाचतो आहे. ज्याच्या प्राप्यतेनें स्त्रियांच्या आयुष्याला मोल प्राप्त होतें, त्याची प्राप्यता मला उभ्या जन्मांत मिळणें अशक्य आहे. स्पष्टच शब्दांत सांगायचं म्हणजे माझे पतीचे ठायीं पुरुषत्व नाहीं.

आमच्या वाड्यांत गुणवंतराव नांवाचे एक इंग्रजी शाळेंतले मास्तर राहायला आले आहेत. त्यांना तुझी "हिरवळ" कादंबरी वाचायला दिली होती. ते एकदां शाळेंत गेले असतांना मी सहज त्यांच्या घरीं गेलें होते, त्यावेळीं त्यांनीं चांगल्या चांगल्या वाक्या-वर कांहीं खुणा केल्या आहेत कीं काय हें पाहण्यासाठीं मी "हिरवळ" उघडली, त्यांत 'प्रकाश' नांवाच्या, त्यांनीं आपल्या स्नेह्यांस एक पत्र लिहीलें होतें. मी उघडून वाचलं.—हो, त्यांच्या पश्चात् वाचलं.

गुणवंतरावांच्या पत्रावरून त्यांना मी हवी आहे हें कळून आलं मला. आणि मला ? लपवून तरी कां ठेवूं मी ? मलासुद्धां ते हवे आहेत. आम्ही दोघेही एकाच सुखासाठीं—(म्हणजे त्यांना त्यांच्या पत्नीपासून हें सुख मिळत नाहीं. त्यांची पत्नी वेडी आहे.) तळमळत आहोंत. आमच्या दोघांच्याही एकमेकांबद्दलच्या आशा, आकांक्षा एकच आहेत. पण आमच्या या आशा—आकांक्षांना, आमच्या मनोवृत्तींना आज प्रचलित असलेल्या रूढ समाजघटनेंत स्थान नाहीं. आम्ही अगदीं विजातीय आहोंत त्या दृष्टीनें.

माझ्या पतिला या सुखाची जरुरी नाहीं, म्हणून मीही त्या सुखाचा त्याग करावा का ? माझे पती उदासीन आहेत त्याबाबत, म्हणून मीही उदासीनच राहावं का ? त्यांच्या या बाबतच्या भावना मेल्या असतील, जळून खाक झाल्या असतील; पण म्हणून माझ्याही भावना मेल्या आहेत, जळून खाक झाल्या आहेत असं गृहीत धरणं इष्ट आहे कां ?

ते माझे पति आहेत असं म्हणायलासुद्धां आतां मला नको वाटतं आहे. संततीचें उत्पादन आणि जोपासना हेंच गृहस्थाश्रमांतील व्यक्तीचें कर्तव्य ना ? मग...मग ???

कुणीं कांहीं म्हणो; मला " आई " व्हायचं आहे. आई होण्यासाठीं माझ्या मनाची तळमळ होते आहे. माझ्या पतीपासून माझी ही इच्छा पुरी होणं शक्य नाहीं हें अगदीं उघड आहे.

वाहवलें नाहीं फार ! स्पष्ट भाषेंत सारं कांहीं सांगून टाकलं म्हणून तूं तिरस्कार तर करणार नाहींस ना माझा ?

जें कांहीं तुला वाटेल तें वाटो. मी माझं दुःख ओकून टाकलं आहे. आतां थोडं तरी हायसं वाटतं आहे माझ्या मनाला, हेंच विशेष आहे.

तुझीच

सौ. वत्सला;

( छे, कशाला हें अपशकुनी सासरचं नांव ? )

नव्हे—**मीनाक्षी खरे.**

* * *

# दैनिक दांडू

## अभिनंदनीय प्रीति–विवाह

येथील सुप्रसिद्ध कलावंत श्री. प्रकाश, मालक ' प्रकाश आर्ट स्टुडिओ ' यांचा विवाह नवोदित गायिका आणि नर्तिका निशादेवी दादरकर यांच्याशीं कालरोजीं नोंदणी पद्धतीनें झाला.

निशादेवी यांची ओळख रसिकांना करून देणें जरूर आहे. निशादेवी या उत्तम गायिका आहेत. त्यांचा आवाज सुरेल आहे. भावमधूर काव्यें अभिनयासहित गाणे हें त्याच्या गायनापैकींचें एक वैशिष्ट्य आहे. त्या उत्तम नर्तिकाही आहेत. नृत्याचेवेळीं चेहऱ्यावर इष्ट तो आविर्भाव दर्शविला पाहिंजे या मताच्या त्या पुरस्कर्त्या आहेत. अभिनयासहित अत्यंत तालबद्ध नृत्य करणें याकडे त्यांचा विशेष कटाक्ष आहे. मुंबई–पुणे वगैरे मोठमोठ्या शहरीं त्यांच्या गायनाचे व नृत्याचे जाहीर प्रयोगही झाले आहेत. स्वभावानें तर त्या दिलदार, मनमिळाऊ–सर्वच दृष्टीनें उत्तम अशा आहेत. त्यांचा जन्म गोमंतकीय ज्ञातींत झाला असून त्यांनीं आपल्या घराण्याची परंपरा कायम राखिली आहे.

श्री. प्रकाश, हे उत्तम चित्रकार म्हणून प्रसिद्धच आहेत. निरनिराळ्या पुस्तकांच्या व मासिकांच्या मुखपृष्ठावर त्यांच्या कितीतरी उत्कृष्ट कलाकृति प्रसिद्ध झाल्या आहेत. " प्रकाश आर्ट स्टुडिओ " नांवाची त्यांच्या मालकीची स्वतंत्र चित्रसंस्थाही आहे. परवांच भरलेल्या अखिल भारतीय चित्रकला प्रदर्शनांत त्यांच्या

“ **अपघात** ” या चित्रास पहिलें बक्षिस मिळालें आहे हें रसिक-गणांस विदित असेलच.

श्री. प्रकाश आणि निशादेवी यांचा विवाह म्हणजे ‘आम्रा त्या पिक सेवितां समसमां संयोग कीं जाहला ” असेंच होय.

निशादेवी या कलेच्या भोक्त्या आहेत. कलेसाठीं त्यांनीं झीज सोसली आहे, कष्ट केले आहेत आणि जरूर तो त्यागही केला आहे. त्या उत्तम कलावंत आहेत. प्रकाश हे सुद्धां कलेचे भोक्ते आहेत. त्यांनींहीं कलेसाठीं झीज सोसली आहे, कष्ट केले आहेत आणि त्यागही केला आहे.

कलावंतांची ओळख कलावंतांशींच व्हायची. “ समान शीले व्यसनेषु सख्यम् ” हाच न्याय इथेंही सर्वथैव लागू आहे.

हा प्रीतिविवाह आहे. शिवाय या प्रीतिविवाहाचें वैशिष्ट्य हें आहे, कीं निशादेवी या गोमंतकीय ज्ञातींतल्या आहेत आणि श्री. प्रकाश हे ब्राह्मण ज्ञातींतले आहेत.

दोघांचाही संसार सुखाचा होवो आणि उभयतां पतिपत्नींना दीर्घायु लाभो ही हार्दिक इच्छा प्रदर्शवून हा “ अभिनंदनीय प्रीति आणि मिश्र–विवाहा ”चा छोटेखानी लेख संपवितों.



## प्रकरण ३ रें

### विवाहापूर्वी

**निशाचें हृत्कथन—**

प्रकाशांचं पत्र आलंय् आज !

प्रकाशांच्या स्टुडिओंत मी प्रकाशांकडे नोकरीला आहे. पगाराचा आंकडा भरपूर असला, तरी नोकर म्हणजे नोकरच. पण नोकराला मालकीण करूं पाहणारे हे मालक अजब खरे.

चित्राच्या मोहकतेंत अन् वास्तवतेंत भर पडावी म्हणून कित्येक वेळीं चित्रकारापुढं अर्धनग्न स्थितींतही आम्हांसारख्या तरुणींना उभं राहावं लागतं. सारखं सारखं अशा स्थितींत पाहावं लागत असल्यानं चित्रकाराची वासना मेलेली असते असं म्हणतात. आणि हा अनुभव मला थोड्याबहूत प्रमाणांत आलाही आहे, पण प्रकाशांच्या बाबतींत मात्र तो सारा अनुभव खोटा ठरला.

" प्रेम " म्हणजे काय याचा अर्थ थोड्याबहूत प्रमाणांत कळून चुकला मला.

चित्रकार म्हणजे कोणी निर्जीव प्राणी नव्हे, कीं त्याला वासना अन् विकार असणं शक्य नाहीं असं म्हणायला ! वासना अन् विकार प्रत्येकाला असतात. त्यांची तीव्र जाणीवही प्रत्येकाला असते. चित्रकाराच्या वासना मेलेल्या नसतात.

प्रेमाराधनेची परिपूर्ती प्रथम विवाहांत आणि नंतर अपत्यजन्मांत अशा चढत्या क्रमानं होत असते. तेव्हां, चित्रकारांच्या मुलांकडे पाहिल्यास त्यांच्या वासना मेल्या आहेत असं कोण धाष्ट्यानं म्हणेल ? निदान मी तरी म्हणूं शकणार नाहीं. तात्पर्य असं, कीं चित्रकाराच्या वासना मेलेल्या नसतात, तर त्या सुप्त झालेल्या असतात. आणि म्हणून अर्धनग्नाकृतीकडे पाहूनही चित्रकाराच्या मनाची व्यग्रता ढळूं शकत नसावी असं मला वाटतं.

" लैंगिक आकर्षण " असाही एक प्रेमाचा अर्थ केला जातो. पण मला स्वतःलाही तें कांहीं पटत नाहीं.

प्रेम आणि विषयवासना हीं खरोखरी अन्योन्याश्रयी खास नाहींत असं मला वाटतं. प्रेमाचं छायांग वैषयिकता असेल, पण कधीं कधीं अंतःकरणांत प्रेमाचा लवलेशही नसतांना विषयवासना प्रबळ होतेच कीं ! आणि त्यावेळीं मनुष्य तृप्तीचा मार्ग शोधीत नाहीं असं थोडंच आहे ? तेव्हां, साहजीकच प्रीति म्हणजे कामुकतेची परिणति असा तिचा ओंगळ अर्थ मला पटणं शक्य नाहीं. तसंच असतं, तर वेश्या खरोखरी प्रेमस्वरूप असतात असं म्हणावं लागेल.

चित्रकारांच्या बाबतींत लैंगिक आकर्षणाच्या दृष्टीनं बोलायचं झालं तर चित्रकारांचं प्रेम मॉडेलसाठीं म्हणून ज्या स्त्रिया त्यांच्याकडं नोकरीला असतात त्यांच्यावर बसलं असतं. पण तें तसं होऊं शकत नाहीं; तेव्हां अर्थातच लैंगिक आकर्षण म्हणजे प्रेम असं म्हणतां येणं शक्य नाहीं.

लैंगिक आकर्षण म्हणजे प्रेम नसून हृद्‌याकर्षण म्हणजे प्रेम असं मला वाटतं.

ज्या ठिकाणीं आसक्ती आहे, प्रेम आहे त्याच्या सान्निध्यांत राहून वियोगावस्थेचा अनुभव घेणं कठीण जातं.

मॉडेलसाठीं म्हणून ज्या स्त्रिया चित्रकाराकडं नोकरीला असतात त्यांचेवर चित्रकारांचं प्रेम नसतं. चित्रकारांचे मनांत त्यांचेविषयीं आसक्ती नसते, म्हणून त्यांच्या सान्निध्यांत–मग त्या स्त्रिया समोर अर्धनग्नच काय, पण पूर्ण नग्न असल्या तरी–चित्रकाराचं मन चलबिचल होऊं शकत नाहीं. आणि जर कां तिच्यावर प्रेम असेल, तिच्याविषयीं आसक्ती असेल, तर तिला समोर उभी करून चित्रकाराला आपलं चित्र पुरं करायला जड जाईल.

अभिलाषित वस्तूच्या सान्निध्यांत राहायचं आणि त्या वस्तूचा उपभोग मात्र घ्यायचा नाहीं, असल्या विचित्र विरोधावस्थेंत सजीव प्राणी टिकून राहूं शकणार नाहीं.

हें सारं सुचायचं कारण असं, कीं ज्या दिवशीं 'ओलेति' चित्राची सुरवात प्रकाशांनीं केली, त्या दिवशीं माझ्यावर त्यांचं प्रेम आहे याची जाणीव त्या दिवशींच्या त्यांच्या कृतीवरूनच

झाली होती. आणि आज आलेल्या पत्रावरून तर खात्रीच झाली माझी. त्यांनीं माझ्याकडून पत्राचं उत्तर मागितलं आहे.

'ओलेति' चित्राची सुरवात करतेवेळीं त्यांनीं मला आवेशानं कवटाळलं हें मला मुळींच पटलं नाहीं. त्यांची अक्षम्य चुकी झाली आहे यांत असं मी समजत नाहीं. मनुष्य आहे; वासना अन् विकार यांवर त्यांचं पूर्ण नियंत्रण असतंच असं नव्हे. आम्हां गोमंतकीय स्त्रियांना तरी याची फार माहिती आहे. कितीही चांगला मनुष्य असला तरी केव्हांतरी तो घसरायचाच. मातीची वस्तु मातीसारखी व्हायचीच. उमरखय्यामनें म्हटलेलं आहेच—

"Oh Thou, who man of baser Earth didst make
And who with Eden didst the Snake
For all the sin where with the Face of man
Is blackened, man's forgiveness give and take."

* * *

पुण्याच्या विजयानंद थिएटरांत माझ्या नृत्याचा प्रयोग होता. एक वर्षापूर्वींची गोष्ट आहे ही.—

नृत्याला आवश्यक असणारीं विलोभनीय वस्त्रं पेहरून मी नृत्यासाठीं बाहेर आलें होते.

थिएटरांत चिक्कार गर्दी भरली होती. मोठमोठे श्रीमान् व्यापारीही माझं नृत्य पाहाण्यास आले होते. त्यांत कित्येक रंगेल हौशी तरुणही होते.

नृत्य संपलं, पडदा पाडला गेला. मी वस्त्रं बदलण्यासाठीं आंत गेलें.

वस्त्रं बदलून मी घरीं आलें. नृत्य करून मी बरीच थकलें होतें. माझा थकवा जावा म्हणून जेवण झाल्यावर आईनं मला मद्य दिलं.

नृत्याचा माझा तो पहिलाच प्रयोग होता. त्यापूर्वी जाहीरपणें मी कधीं नृत्य केलं नव्हतं. अन् मद्यही मी कधीं घेतलं नव्हतं.

शेटजी घरीं आले म्हणजे आई शेटजींच्या बरोबर कधीं कधीं मद्य घेत असे हें मी पाहिलं आहे, पण मीं मात्र त्यावेळीं कधीं मद्य घेतलं नव्हतं.

नृत्य शिकतांना मी अतोनात मेहनत घेतली होती. त्यावेळीं तर मला भारी श्रम होत असत. पण त्यावेळीं माझा थकवा जाण्यासाठीं आईनं कधीं मला मद्य दिलं नव्हतं.

पण आज आईनं मला मद्य कां दिलं हें कळून आलं मला.

मद्याचा प्याला पुढें करतांना केवळ थकवा जावा म्हणून देते आहे असं ती म्हणाली होती. शिवाय आपणांला मद्य हें घेतलंच पाहिजे त्याशिवाय आपलं चालणं शक्य नाहीं, तेव्हां आत्तांपासूनच त्याची संवय असणं जरूर आहे. असंही कांहींसं ती म्हणाली होती.

मीही विशेष आढेवेढे घेतले नाहींत. यापूर्वी आईनं किंवा आई-बरोबर शेटजींनीं मद्य घेतांना मी कितीतरी वेळां पाहिलं आहे. त्या-वेळीं मद्य घेण्याचा मोह मला अनावर होत असे हें मी कबूल करतें. आपणही असंच मद्य घ्यावं नि त्या गुंगींत स्वस्थ मस्तपणें पलंगा-वर पडून राहावं असं फार फार वाटे मला त्यावेळीं; पण तसं बोलून दाखविण्याचं धैर्य होत नसे मला.

" वयांत येणं " म्हणजे काय, हें मला त्यावेळीं कळत नसे. शेटजींशीं बोलतांना आईनें–' पोरगी नुक्तीच वयांत आली आहे, कुणाशीं तरी तिचा झुलवा लावून टाकायला हवा '–असे उद्गार काढले होते. तिचे ते बोल ऐकून मला चमत्कारिकच असं कांहींतरी वाटूं लागे. तें ' वयांत येणं ' म्हणजे काय, ' झुलवा ' म्हणजे काय कांहींच माहीत नव्हतं मला.

माझ्या शाळेंतल्या मैत्रिणींचीं लग्नं झालेलीं मला ऐकून माहीत झालीं होतीं. मी कधीं त्यांच्यांत मिसळत नसें आणि त्यांनींही कधीं तसा हव्यास दर्शविला नाहीं. मैत्रिणींच्या झालेल्या लग्नांकडे पाहून ' लग्न ' म्हणजे काय हें मला कळून आलं होतं, पण त्यांतलं ' गम्य ' काय हें मात्र माहीत नव्हतं.

एकदां मी अशीच सायंकाळीं आईच्या मांडीवर लाडिकपणानं बसलें होतें. सहज बोलतां बोलतां मी आईला विचारलं—

" आई, लग्न ग केव्हां करणार माझं ? "

आईनं विस्मयानं पाहिलं माझ्याकडे !

" लग्न ?–हा वेडे, ती चाल आपणांकडे नाहीं हं ! भलतं सलतं बोलूं नये. " आई उत्तरली.

' लग्नाचीसुद्धां चालरीत आहे वाटतं. मग त्या शाळेंतल्या मैत्रिणींच्या घरीं लग्नाची चाल आहे असं दिसतं आणि आमच्या घरीं नाहीं. ' कितीतरी विचार माझ्या मस्तकांत घोळत होते. पण त्याबद्दल मी जास्तसा खुलासा विचारला नाहीं आईजवळ.

भबक पोषाक केलेले,—कित्येक नवीन नवीन माणसं घरीं येत. आईशीं बोलत अन् निघून जात. अशीं कांहीं नवीं माणसं घरीं आलीं कीं त्यांना पानाचे विडे करून देणं वगैरे कामें मला करावीं लागत. माझ्या नटण्यामुरडण्याकडे तर त्यावेळीं आई फार लक्ष देत असे.

आईचं अन् त्यांचं काय बोलणं होई याकडे लक्ष देण्याच्या फंदांत मी कधीं पडलें नव्हतें. पण तरीसुद्धां "वयांत आलेली निशा, झुलवा, पैसा—करार" हे शब्द कानांवर पडतच असत. तीं माणसं उठून चाललीं, कीं कुणी एकादी वस्तू देणगीदाखल देऊन जात. एकानं तर सोन्याची अंगठी मला दिली होती. त्यानं माझा हात हातांत घेतला होता आणि हलकेच माझ्या करंगळींत हंसत हंसत ती अंगठी सरकवली होती.

मला पक्कं आठवतं आहे; त्यानंतर मात्र कधीं कुणी आमच्या घरीं आलं नाहीं. जे आले ते फारच थोडा वेळ बसत अन् निघून जात.

अंगठी देणाऱ्या त्या तरुणाची मूर्ती मी आठवूं लागे. शेटजी अन् आई बोलत बसलेलीं असलीं म्हणजे मलाही असंच कुणाबरोबर तरी बोलत बसावं असं वाटूं लागे. अन् त्यावेळीं त्या अंगठी देणाऱ्या तरुणाचा पुसटसा चेहरा मनःचक्षूंपुढें उभा राही. थोडक्यांत त्यावेळीं मला माझ्या स्त्रीत्वाची जाणीव आली होती, अन् ती जाचक होत होती.

त्याचवेळीं मी नृत्याचे धडे घेत होते. भल्या पहांटे उठावं आणि गायनाचे आलाप काढीत बसावं, नंतर उजाडल्यावर चहा

वगैरे घेऊन थोडा वेळ होतो न् होतो तोंच पुन्हां नाचाला उभं राहावं असा क्रम होता त्यावेळीं माझा. मी तरबेज झालें असं वाटलं आईला. आईनं आणि नृत्य शिकवणाऱ्या मास्तरांनीं एकमतानं विचार करून, माझ्या नृत्याचा जाहीर प्रयोग एकदां करायचा असं ठरविलं.

माझी भीड चेपावी, मला धैर्य यावं यासाठीं आईनं रोज रात्रीं घरीं माणसांना जमवावं नी माझा नृत्याचा समारंभ घडवून आणावा असा क्रम चालू ठेवला. आणि खात्री झाल्यानंतर तिनं विजयानंद थिएटरांत प्रयोग जाहीर केला.

पडदा उघडल्यानंतर जेव्हां मी रंगभूमीवर प्रथम आले तेव्हां मी थोडीशी भेदरलेंच ! पण लौकरच ती भीती नष्ट झाली अन् खुलेपणानं नाचूं लागले.

थोड्यावेळानं माझी दृष्टी सर्व थिएटरभर फिरूं लागली. माझं लक्ष पहिल्या रांगेतल्या एका खुर्चीकडे गेलं—नी कां कोण जाणे, मी स्वतःलाच नकळतपणें गालांतल्या गालांत हंसले. मला वाटतं आमच्या घराण्याची ही इज्जतच अशी असावी.—त्या खुर्चीवर मला सोन्याची अंगठी देणारा तरुण होता.

त्यानंतर माझं लक्ष नृत्यांत राहीना. पावलं चुकीचीं पडूं लागलीं, ताल चुकूं लागला, अभिनयही नीटसा जमेना.

एक वाजतां कार्यक्रम आटोपला. घरीं परत यायला दीड वाजून गेला होता. मला भेटण्याची पुष्कळांनीं इच्छा दर्शविली, परंतु आईनं सर्वांना नकार दिला.

जेवण झाल्यावर मद्य दिलं, मी घेतलं. नंतर मी खोलींत झोंपण्यासाठीं गेलें. मद्याचा पूर्ण अम्मल चढला नव्हता हें खरं, पण त्या नशेंत मी खोलीचा दरवाजा लावून घ्यायला विसरलें.

मला अंगठी देणारे ते तरुण, मघाशीं थिएटरांत पहिल्या रांगेंतल्या खुर्चीवर बसलेले तरुण हळूच आंत आले. त्यांनीं दार लावून घेतलं, मी पाहात होतें तें, पण मनाई मात्र केली नाहीं.

पहांटे पहांटे मद्याचा अम्मल नाहींसा झालेला जाणवला. मद्य घेण्यापूर्वींची स्थिति लक्षांत आली; मद्य घेतल्यानंतरची स्थितीही स्वप्नांत पाहिलेल्या दृश्यासारखी आठवूं लागली. मी लाजलें, स्वतःला शरमही वाटूं लागली,–मी झटकन् पलंगावरून उडी मारली अन् दूर दूर झालें पलंगापासून—

पलंगावर तो तरुण–गाढ झोंपीं गेला होता.

* * *

त्या तरुणाशीं आईनें माझा झुलवा लावून टाकला होता.

'झुलवा' म्हणजे काय हें आत्तां मला कळून आलं. झुल-व्याचे वेळचे आमच्या ज्ञातींत रूढ असलेले औपचारीक विधी पूर्वींच झाले होते. ज्या दिवशीं 'झुलवा' लावला जातो, त्या दिवशीं शेटजींनीं–( यजमानांना 'शेटजी' म्हणण्याची आम्हांकडे प्रथा आहे. मग तो यजमान कसाही असो. ) हातांत अंगठी चढवायची असते. हा शेवटचा पण अत्यंत महत्वाचा विधी समजतात. त्यापूर्वीं मामुली पद्धतीनं तंबोऱ्याशीं लग्न लावलं जातं.

अस्सल गोमंतकीय ज्ञातींतले नव्हेत आम्ही. भेसळ गोमंतकीय कलावंतिणी म्हणून ज्यांना ओळखलं जातं त्या ज्ञातींतले आम्ही आहोंत.

तें 'वयांत येणं,' तो 'झुलवा' साऱ्याचे अर्थ मला चांगल्या रीतीनीं समजले.

*　　　*　　　*

आईनं मला एका डॉक्टरकडे नेलं. डॉक्टर नी आई काय बोलत होते हें मी लांब असल्यानें मला कळलं नाहीं. नुसतंच बोलणं झालं नी आम्ही परतलों. मी आईला विचारलं त्याबद्दल, पण तिनं कशाचाच सुगावा लागूं दिला नाहीं.

रात्रीं डॉक्टर घरीं आले.

शेटजीही घरीं आले—ते रोजच येत.

ते माझे शेटजी होते. जेवण झाल्यावर नित्याप्रमाणं मी खोलींत गेलें.

मनांत मात्र सारखे विचार चालूं होते.

डॉक्टर घरीं कां बरं आलें असावेत ?

आजच्या दिवसापुरते ते आईचे शेटजी तरी झाले नसतील ? कोण जाणे !

सकाळीं आईनं शेटजींना 'पुन्हां चारपांच महिने तरी येऊं नका' असं बजावलं. नव्हें, 'झुलवा' तुटल्याचं सांगितलं.

पुन्हां मी नी आई दवाखान्यांत गेलों.

डॉक्टरनीं मला टेबलावर व्हायला सांगितलं, नी—???

माझ्या पोटांतला गोळा कापून टाकला.

शस्त्रक्रियेची जखम बरी व्हायला एक महिना लागला.

* * *

त्यानंतर एकदां डॉक्टर घरीं आले. आईनं त्यांचं स्वागत यथायोग्य केलं.

पण त्याच दिवशीं मला पुरुषांच्या ओंगळ कामुकतेची शिसारी आली.

एक महिन्यापूर्वीं हेच डॉक्टर आईकडे आले होते आणि आज—!!!

मी आढेवेढे घेतले, नकारही दिला, पण आईच्या शब्दाखातर तयार झाले.

* * *

त्यानंतर मला साऱ्याचीच शिसारी आली. ते डॉक्टर, ते पोलीस इन्स्पेक्टर साऱ्यांना मी स्पष्ट शब्दांत नकार दिला. आई रागावली, चरफडली, पण शेवटीं स्वस्थ राहिली.

डॉक्टर—पोलीस इन्स्पेक्टर—सी. आय. डी. खात्याचे अधिकारी—समाजांत उजळ माथ्यानें वावरणारे हे लोक किती झब्बू असतात याची यथार्थ कल्पना फक्त आम्हांलाच असते.

* * *

शशि–निवास,
दादर–मुंबई.

प्रिय ताईस सप्रेम साष्टांग नमस्कार:—

तुझें सखोल भावनेनें प्रेरित झालेलें, उद्वेगजनक पत्र मिळालें. तूं आपलें अंतःकरण इतकें स्पष्टपणें खुलें केलें आहेस, कीं तें पाहून मला खरोखरीच तुझ्याबद्दल जास्त आदर नी सहानुभूति वाटूं लागली आहे. ताई, तूं तुझें सारें दुःख ओकून टाकलेंस, मग मला माझ्या मनाच्या वेदना तुझ्याजवळ उघड नको बोलून दाखवायला ?

माझ्या प्रसिद्ध झालेल्या दोन्हीं कादंबऱ्या मी तुजकडे पाठविल्या आहेतच. दोन्हींच्या मुखपृष्ठावरील ज्यांनीं चित्रें काढलीं आहेत त्या चित्रकारावर माझें प्रेम आहे. हो, खोटें कशाला बोलूं ? मात्र मी त्यांना त्याबद्दल विचारलें नाहीं.

मी लेखिका असलें, तरी बाबांच्याजवळ ही गोष्ट बोलून दाखवण्याइतकें मनोधैर्य माझें नाहीं ! ही माझी दुर्बलता मला घातक आहे, याची जाणीव आहे माझ्या मनाला–पण–पण–नको वाटतें बाबांच्याजवळ हें सारें सांगायला–आणि—

मी त्या चित्रकारांच्या जवळसुद्धां कधीं माझें मनोगत व्यक्त करून दाखवलें नाहीं. समजा, मी माझें मनोगत व्यक्तविलें अन् त्यांनीं स्पष्ट नकार दिला तर ?...तर...असो.

छापखान्यांतून कादंबरीचीं प्रुफें तपासायला आलीं आहेत, तीं लौकर परत करणें भाग आहे; म्हणून सध्यां एवढ्यावरच पुरें करतें.

तुझीच

**इंदुमती खरे.**

*        *        *

मुरारजी पेठ,

सोलापूर.

प्रिय मित्र प्रकाश यांस सप्रेम नमस्कार :—

निशादेवी नांवाच्या एका नृत्यांगनेशीं तुझा विवाह नोंदणी पद्धतीनें झाला असल्याची बातमी मी कालच्या वृत्तपत्रांत वाचली. गृहस्था, मित्राला लग्नासाठीं बोलवायचं तरी होतंस ! कां, विसरलास या गरीब मित्राला नव्या बायकोच्या दिमतीपुढं ? असो, थट्टा पुरे करतों.—आतां थोडासा खुलासा विचारतो—नृत्यांगनेशीं विवाह करण्यांत तुझा कोणता हेतू आहे हें सांगशील काय ? पत्रोत्तर जरूर द्यावें. कळावें.

तुझाच

**गुणवंत.**

*        *        *



## प्रकरण ४ थें

### विवाहानंतर

**सौ. वत्सला ऊर्फ मीनाक्षी खरे :—**

शेजारच्या निर्मलेला आज चौफाळयावरील चोळी होती आमच्या घरीं ! मूल होऊन मेलेलं पुरवलं, पण वांझोटी राहूं नये म्हणतात. दुपारीं गुणवंतराव यशवंतांची "आई" कविता मोठ्यानें म्हणत होते—मला ऐकूं येत होतं. अंतःकरणाला घरं पडत होतीं ती कविता ऐकतांना ! मला मूल झालं तर ? जर तरच्या या गोष्टी हव्यात कशाला ? मला मूल होणंच शक्य नाहीं हें अगदीं उघड आहे.

आज लग्न होऊन सहा वर्षें झालीं, पण सुखाचा लवलेशसुद्धां कपाळीं नाहीं. हें कुंकू—खरंच, करायचं आहे काय लावून ? टाकूं का पुसून ?

माहेरचीं पत्रं आलीं, कीं त्यांत माझ्या नांवामागें "सौभाग्यवती" हा शब्द लिहीलेला मला दिसून येतो, पण सौभाग्यवती असूनही विधवेप्रमाणें आयुष्य घालवावं लागतं आहे मला याची त्यांना कांहीं तरी जाणीव असेल कां ? घरांत खायला–प्यायला, ल्यायला–नेसायला भरपूर असलं म्हणजेच खऱ्या सुखाची प्राप्ती झाली असं म्हणायचं कां ? मला कांहीं भावना–वासना–विकार कांहीं नाहींतच कां ? पण असून तरी काय उपयोग ? "आई" व्हावं असं मला फार फार वाटतं आहे, पण माझी ही आई होण्याची इच्छा माझ्या पतीपासून पुरी होणं शक्य नाहीं हें अगदीं उघड आहे.

बायका जमल्या होत्या, साऱ्याजणीं निर्मलेची वाट पाहात होत्या. ती ही थोड्या वेळानें आली. मी हंसतमुखानें सामोरी गेलें अन् तिचा हात धरून तिला चौफाळ्यापर्यंत आणलं. ती चौफाळ्यावर बसूं लागली, तितक्यांत अल्लड उषेनं तिला अडविलं. "हां निमाताई, आधीं नांव घ्या आणि मग चौफाळ्यावर बसा."

मी माझं दुःख शक्य तों लपविण्याचाच प्रयत्न करीत होतें. चेहऱ्यावर कांहींएक दिसूं नये याबाबत मी जास्तींत जास्त खटपट करीत होतें. वरून माझा चेहरा हंसत होता, पण आंत–आंत दुःखाचे कढ उकळत होते.

नांव घेतांना हिच्या हृदयाला गुदगुल्या होत असतील नाहीं ? आणि माझ्या ? चरकाच बसतो माझ्या हृदयाला ! नांवाचं मोलच इथं व्हायचं कठीण—

"चांदीच्या वाटींत गुलाबाचं सरबत......"

निर्मला नांव घेत होती.

तिला पुरतं नांवसुद्धां घेऊं दिलं नाहीं अवखळ उषेनं. तिचं अपुरं राहिलेलं नांव पुरं केलं तिनं—

"...राव गेले गांवाला मला नाहीं करमत !"

निर्मला चिडली. रुसली–पण तिचा तो रुसवा लटका होता. "इश्श, असं ग काय करतेस उषे ? आतां नाहीं मी घेणार नांव ! आतां आधीं वत्सलेला नांव घेऊं द्या, मग मी घेईन." निर्मला म्हणाली.

मी भांबावले. नांव घ्यायचं ? कशासाठीं ? आणि घेणार तरी काय मी नांव ? नवऱ्याविषयीं माझं मनच जर विटलं–हो, "चांदीच्या वाटींत खमंग पिठलं; नी पुरुषोत्तमाविषयीं माझं मन विटलं." काय हरकत आहे हें नांव घ्यायला ? पण छे; बरं नाहीं दिसणार तें !

"सागवानी टेबलावर रुमाल टाकला विणून, पुरुषोत्तमरावांचं नांव घेते आग्रह केला म्हणून." मी नांव घेतलं. नांव घेतांना "आग्रह केला म्हणून." या शब्दांवर विशेष जोर दिला मी !

"फुलांत फूल सुंदर जाई–वसंतरावांचं नांव घेते करूं नका घाई." निर्मलेची फटाकडी उडाली.

केळीं–चिवडा वगैरे खाद्य पदार्थ प्रत्येकीच्या पुढ्यांत ठेवले, अत्तर गुलाब यांचा शिडकाव केला. एकीनें "डोहाळे" म्हणण्यास सुरवात केली. मी चौफाळयाजवळ गेलें नी चौफाळयाच्या कडीला धरून हळूंच चौफाळा हलवीत निर्मलेला म्हणाले—

" निमाताई, मुलगी नको आहे हं ! मुलगा हवा. "

तिच्याकडून उत्तर मिळालं मला ! पण अंतःकरण विदारलं तिचं उत्तर ऐकून ! सुरीनें चिरल्यागत वेदना झाल्या मला.

" हरकत नाहीं. मला मुलगा अन् तुला मुलगी होऊं दे हं ! मग माझ्या मुलाला तूं आपली मुलगी दिली पाहिजेस ! पण गडे, भांडायचं नाहीं आपण इतर विहिणींच्या सारखं !" निर्मलेचं उत्तर !

माझ्या दुःखावरली खपली काढली निर्मलेनं ! मी अगदीं रक्त-बंबाळ झालें. आतांपर्यंत खूप रंगून गेलें होतें मी ! पण निर्मलेच्या त्या उत्तरानं पुन्हां कसं सुन्न झालं मस्तक ! तो सोहळा पाहणं देखील नको वाटलं मला. कोणाला काय वाटेल याची मी पर्वाच केली नाहीं. मी निघून गेलें झटकन् तिथून ! डोकं अगदीं तापून गेलं होतं, नी पायांतही मुळीं त्राण नव्हता माझ्या ! एक क्षणही थांबले नाहीं मी तिथं.

* * *

त्याच दिवसाची सायंकाळची गोष्ट—

दुपारीं झालेल्या प्रकारानं मी अगदीं उदास नी खिन्न होतें. माझं कशांतच लक्ष नव्हतं.

कांहीं तरी काम निघालं म्हणून मी गुणवंतरावांच्या घरीं गेलें होतें. गुणवंतराव घरीं एकटेच होते. त्यांना पाहिलं नी तत्क्षणीं माझ्या साऱ्या सुप्त शक्ती उफाळून आल्या. ते परके आहेत याची जाणीव विसरून गेलें मी !

आणि माझं दुःख ओकून टाकलं मी त्यांच्यासमोर—

" गुणवंतराव, दुपारीं चोळीच्या वेळीं चूक घडली पहा माझ्या-हातून. भावनाविवश झाले होते पहा मी त्यावेळीं ! मी तरी काय करणार ? घरांत सासूबाईच्या जवळ बोलायची चोरी, त्यांच्या-जवळ तर वाच्यताही करायला नको; मग...मग...तुम्ही म्हणूनच सांगते आहे मी. कुठं तरी दुःख ओकल्याशिवाय वरं नाहीं वाटत पहा मनाला. "

आणि सारं कांहीं सांगून टाकलं मीं. मात्र सांगतांना उमाळा दाटला होता.

" नका, वत्सलाबाई, रडूं नका ! तुम्हांला असं रडतांना पाहिलं म्हणजे साऱ्या भावना उफाळून येतात पहा. तुमच्या दुःखाची जाणीव झाली कीं त्वेष चढतो माझ्या मनाला, नी रूढीचे लंगर तोडून सुखाच्या स्वैर मैदानावर नाचावंसं वाटतं–तुम्हांला नाहीं तसं वाटत ?–" सहानुभूतीचा ओलावा प्रकटला.

त्यांच्या शेवटच्या वाक्यांतली खोंच कळून आली मला, सुखोत्पादक पण अननुभूत संवेदना तरळल्या. कांहीं क्षण मी तन्मय झाले.—पण नंतर त्यांची ती खोंच कळली असूनही न कळल्याचा आविर्भाव करीत मी म्हणाले—

" खूप वाटतं. पण मनाप्रमाणं कां साऱ्या गोष्टी घडून येतात ? अहो, तसं असतं तर या पृथ्वीला स्वर्गाचं स्वरूप प्राप्त झालं असतं. "

" किती मनस्ताप वाढवितां आहांत ? "

माझं दुःख पिकलं होतं. पिकून आलेल्या बेंडावर सुईनं टोंचल्या-बरोबर त्यांतून नासलेल्या रक्ताची धार उडत नाहीं कां ? तसं झालं होतं माझं. त्यांच्या त्या शब्दोच्चाराबरोबर माझ्या दुःखाची धार उडाली.

"काय करणार ? निमानं नांव घेतलं, नी माझ्यावर जेव्हां नांव घ्यायची पाळी आली तेव्हां चरकाच बसला माझ्या हृदयाला. मुला–मुलींची गोष्ट निघाली,–मीं कशी भाग घेऊं त्यांत ? मला कां मूल होऊं नये वाटतं ? पण मूल होणं माझ्या हातचं आहे कां ? नाहीं कां वाईट वाटणार मला ?"

"वाटायचंच ! पण म्हणून मनावर परिणाम कां करून घ्यायचा असतो ? बेडर जिवानं आयुष्य घालवावं लागतं या संसारांत–" निघालेल्या दुःखावरील खपली आस्थेवाईकपणें बसवि-ण्याचा प्रयत्न करीत होते गुणवंतराव.

त्यांचा 'संसार' शब्द ऐकला नी माझा साराच "संसार" माझ्यापुढें उभा राहिला.

"संसार ? याला संसार कां म्हणायचा ? पदरीं पडलं नी पवित्र झालं–असंच म्हणायचं नशिबांत आलं आहे माझ्या. आहे यांत समाधान मानायला हवं, हें कळतं मला, पण अंतःकरण राहवतं कां कधीं ?"

"जाती घडी आपली समजून काळ कंठावा लागतो वत्सलाबाई."

"कसली जाती घडी नी कसला काळ ? जन्म घेतांना या सुखाची मागणीच केली नसेन मी देवाजवळ ! बाकी देवाला तरी

कां दोष द्यायचा म्हणा. आपलं नशीबच भिकार, तिथं कोण काय करणार ? त्यांना तरी निष्कारण कां वाईट म्हणूं मी ? माझ्या सुखासाठीं ते थोडं कां जपतात ? मला आवडेल तीं लुगडीं—पातळं घेऊन देतात. फुलांच्या वेण्यांचा—नी गजऱ्यांचा तर भारी षोक इकडं ! पण मलाच त्यांचा तिटकारा वाटतो त्याला मी तरी काय करणार ? तीं उपांग सुखाचीं उपकरणीं पाहिलीं, कीं डोक्याला तिडिक उठते माझ्या. मुख्य सुखच जर मला मिळूं शकत नाहीं, तर मग या उपांग सुखाच्या उपकरणांची काय बरं जरूरी ? आणि म्हणूनच मला तीं लुगडीं—पातळं नी त्या वेण्या नको वाटतात पहा गुणवंतराव !"

"मनुष्याचं मनच मुळीं मोहसुलभ आहे. आपल्याला जें हवं असतं, तें नाहीं मिळालं म्हणजे साहजिकच त्याच्या मनाची तगमग वाढूं लागते. असाध्य वस्तूचं आकर्षण क्षणोक्षणीं वाढतच जाणार. तुम्हीं या असल्या बाबींचा मुळीं विचारच करूं नका." उपदेशामृताचे घोट पाजीत होते ते.

रात्रंदिवस घोळतं आहे माझ्या मस्तकांत, नी म्हणे विचार करूं नका ! कमळाची पाकळी आडवी आल्यानंतर चक्रवाकीला ओरडूं नको असं म्हटल्यानं थोडीच ओरडायची थांबणार ती ?

पण हें त्यांना सांगून काय उपयोग ?

माझ्या भावना अगदीं उफाळून आल्या आहेत. माझं पावित्र्य टिकेलच असा भरवंसा नाहीं मला. मी मनुष्य नव्हे कां ? पशू पक्ष्यांनाहीं भावना—वासना आहेत. त्यांनाही स्त्री पुरुष हा भेद

कळतो, मग मी तर काय माणूसच आहे. माझ्या प्रदीप्त भावना मला जाणवतात नी जाचकही होतात. मी माझ्या सुखाचा पल्ला गांठणार! सुखाच्या मार्गावरलीं कांटेरी कुंपणं ओलांडून, रूढीचे-धर्माचे खांचखळगे तुडवून मी पुढं जाणार! जगांतल्या सुखांचा उपभोग घेण्यासाठींच मनुष्याचा जन्म आहे. नव्हे कां? पुरे झाला हा जाच! आतां अगदीं सहन होत नाहीं हा जाचक मारा माझ्या मनाला! कोणी कांहीं म्हणो, मला "आई" व्हायचं आहे. "आई" होण्यासाठींच मी झटणार. बांध घालून आडवलेलं पाणी किती काळ ताब्यांत राहणार? थोडीशी फट सांपडली, कीं अखेर वाट फुटेल तिकडे सैराट धांवत जाणारच तें! मनुष्याच्या मनाचंही तसंच नाहीं का? मुद्दाम अडवून-दडपून ठेवलेल्या भावनांवर किती दिवस नियंत्रण राहाणार? अखेर व्हायचं तें होणारच!

गुणवंतराव! किती सालस नी मनमिळाऊ आहेत ते! दुसऱ्याचं दुःख तें आपलं दुःख समजून किती झटकन् समरस होतात! आणि बोलतातही किती गोड! विद्वत्तेच्या बाबतींत गुणवंतरावांपेक्षां माझे पतीच जास्त सरस आहेत हें खरं, पण नुसत्या विद्वत्तेला घेऊन काय जाळायचं आहे? पुरुष म्हटला, कीं त्याच्या अंगीं पुरुषार्थ हवा!

गुणवंतराव—कशाला 'गुणवंतराव' हा मानभावी शब्द? गुण-वंत—हो, गुणवंतच म्हणणार मीं त्यांना! माझ्या निराशमय अंतःकरणांत प्रीतीची ज्योत तेवत ठेवणारे गुणवंत;—गुणवंत—माझे गुणवंत—हो; माझेच ते! अश्शी जाते, नी "मी तुमची ना?" असं विचारते गुणवंतरावांना!

* * *

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

प्रियमित्र गुणवंत यांसी,

सुप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र मिळालें, तूं विचारलेल्या सर्वच प्रश्नांचीं उत्तरें मी आजच्या या पत्रांतून देण्याचें ठरविलें आहे.

मनुष्याचे सारे सद्गुण (अथवा दुर्गुणही) त्याच्या डोळ्यांत एकवटलेले असतात. आणि हे एकवटलेले गुणच डोळ्यांतून लुकलुकतात. डोळ्यांत चमकणाऱ्या तेजावरून सद्गुणी अथवा दुर्गुणी जाणायचं असतं. डोळ्यांतून डोकावणाऱ्या या तेजाकडे दुसरा समस्वभावी जीव ओढला जातो–आकर्षिला जातो.

वयाचा वसंतऋतु–अनुभवाची अजाणता आणि आजूबाजूचें मोकाट–सैराट वातावरण ! सारा विवेक ठार मरतो या वेळीं आणि निरागस लीलांचा सुळसुळाट होतो.

मनुष्याच्या अंतर्यामांतील गुणांची अमावास्या अगर पौर्णिमा डोळ्यांना ताबडतोब कळून येते. सद्गुणी मनुष्याच्या डोळ्यांतील तेज सहसा कधीं झांकत नाहीं. जगांतल्या वाईट अन् हिडिस गोष्टींची मोजदाद त्याच्या अंतर्यामांत नसते, आणि म्हणून त्याच्या ठायींचे सद्गुण डोळ्यांतून ओसंडत आहेतसं दिसतं. जें त्याच्या हृदयांत–अंतर्यामांत असणार तेंच त्याच्या डोळ्यांत दिसणार, आणि जें डोळ्यांत दिसणार तेंच त्याच्या अंतर्यामांत असणार !

अशा वेळीं मनांचा मेळ बसतो, पण खेळ डोळ्यांचा होत असतो. या डोळ्यांनीं खेळल्या जाणाऱ्या संकेतांतून निर्माण होणारी प्रीति ही अखंड अभिनव असते.

हें इतकं सांगायचं कारण असं, कीं माझ्याकडे एक तरुण लेखिका नेहमीं नेहमीं येते. तिच्या प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांच्या मुखपृष्ठांवरील चित्रें मी काढलीं आहेत. ती स्वरूपानें रतिसारखी सुंदर नाहीं, पण शूर्पणखाही नाहीं. तिची अंगकांति केतकीच्या कोंवळ्या पानांसारखी गौर नाहीं, पण अगदींच कोळशाच्या खाणींतूनही निघालेली नाहीं ती ! तिचें शरीरसौष्ठवही चवळीच्या शेंगेसारखं अगदींच बारीक नाहीं, कीं बाहव्याच्या शेंगेसारखं बोजडही नाहीं.

तारुण्याचा वसंतऋतु शरीराच्या साऱ्या रोमरोमांत विलसलेला; लेखिका असली तरी प्रत्यक्ष अनुभवाची अजाणता, आणि स्वैर–मोकाट वातावरण ! विवेकाला वाव राहिला नाहीं, आणि नयन-संकेताला सुरवात झाली. माझ्याविषयींचा सारा प्रेमभाव तिच्या डोळ्यांतून लुकलुकतो आहेसं स्पष्ट दिसून आलं.

क्रिया झाली, कीं प्रतिक्रिया ही व्हायचीच !

डोळ्यांच्या खेळाला सुरवात झाली. आणि–आणि–तिच्या नयनकिरणांनीं माझ्या अंतर्यामांत नंदादीप चेतविला गेला ! पण–पण— ? ? ?

माझ्या मनाची दोलाचल स्थिति झाली होती. इकडे त्या लेखिकेची निर्भेळ, निरागस प्रीति आणि तिकडे निशेच्या सोत्कंठित

मोहक सौंदर्याची मस्त नशा ! दोहींच्या कात्रींत सांपडलेल्या माझ्या मनावर निशेच्या सौंदर्याची पकड जास्त प्रमाणांत बसली. त्याला कारण आमच्या सहवासांतला सततपणा हेंही एक असूं शकेल. एकीकडे त्या लेखिकेच्या नेत्रांत खेळणारी चोरटी शालीनता, तर दुसरीकडे उघड उघड होणाऱ्या नेत्रकटाक्ष–शरांचा अखंड प्रहार ! अंतःकरणाचा ओढा त्या लेखिकेकडे तर शरिराचा ओढा निशेकडे अशी अवस्था निर्माण झाली, आणि अखेर व्हायचं तें झालंच !

" ओलेति " चित्र काढायला बसलों होतों. निशेला पोज् दिली, पण चित्र–फलकाकडे लक्ष जाईना ! सारं लक्ष निशेच्या ओल्या पातळाआडून डोकावणाऱ्या अवखळ सौंदर्यानें पूर्ण वेधून घेतलं होतं. ताबा राहिला नाहीं मनावर ! घट्ट कवटाळली मीं तिला.

मनाच्या विभ्रम स्थितींतच मी एकदां तिला पत्र लिहून माझं मनोगत कळविलं होतं. पण त्या वेळीं तिच्याकडून उत्तर आलं नाहीं. त्यानंतर जेव्हां हा प्रसंग घडून आला तेव्हां मात्र मी माझ्या मनाशीं ठरविलं, कीं पुरे झाला आतां हा लपवाछपवीचा खेळ ! आतां हा खेळ आटोपलाच पाहिजे. पण त्या लेखिकेकडे असणारा मनाचा ओढा तो खेळ आटोपूं देईना ! एकदां वाटे, त्या लेखिकेलाच सारं कांहीं सांगून टाकावं, तिची क्षमा मागावी न् जुळल्यास तिच्याशींच विवाहबद्ध व्हावं ! पण पुन्हां मनांत विचार येई–छे, त्या निष्पाप बालेला काय म्हणून फसवायचं ? त्यापेक्षां जिच्या सान्निध्यानें शरिराच्या चांगुलपणाची माती झाली तिच्याच...?

होय, खरं आहे अगदीं ! अंतर्यामाचा निर्भेळ चांगुलपणा राखण्यासाठींच–तिला फसवायचं नाहीं म्हणून–मी लेखिकेला सोडून दिलं नी निशेशीं विवाहबद्ध झालों. भेसळ गोमंतकीय ज्ञातींतल्या निशेचं ओंगळ सान्निध्य विवाहाशिवायसुद्धां मला लाभलं असतं; पण मग, प्रीतीची फसवणूक–प्रतारणा आणि स्वैराचाराचा स्पर्श या दोहोंमुळें अंतर्यामांतला सारा चांगुलपणा नष्ट झाला असता. विवाहाला तर एका पायावर निशा तयार झाली. हल्लीं गोमंतकीय ज्ञातींत विवाहाची लाटच उसळली आहे. निशेनं आपल्या पूर्वायुष्याची माहिती मला करून दिली नाहीं, आणि मीही कधीं त्या फंदांत पडलों नाहीं.

आज मी निशेशीं–नृत्यांगनेशीं–विवाह करून जगाच्या टीकेला कारणीभूत झालों आहे. मनाचा चांगुलपणा राखण्यासाठीं जगाची असह्य टीका सहन करतों आहे. वरपांगीं हंसणारं–देखल्या देवा दंडवत करणारं–हें जग आंतून माझा तिरस्कार करतं आहे याची पुरेपूर जाणीव आहे मला. जगानं तिरस्कारलं तरी पर्वा नाहीं मला त्याची ! पण मित्रा, तूं नाहीं ना मला तिरस्कारणार ? तुझ्या प्रेमजलाचा एकच बिंदू या तळमळणाऱ्या माशाच्या जीवनाला तारक आहे. तुझ्या प्रेमाचा सिंधू नको, पण एक कां होईना–तो बिंदू मला हवा आहे.

माझं शरीर विवाहित आहे, मन मात्र अविवाहित आहे. शरीर निशेचं आहे आणि मन त्या लेखिकेचं आहे.

मला शक्य होता तेवढा सारा खुलासा मी केला आहे. यापेक्षां जास्त असं कांहीं सांगण्यासारखं उरलं नाहीं. कळावें.

तुझाच ( प्रेमाभिलाषी ) ·

**प्रकाश.**

* * *

**इंदुमती खरेची रोजनिशी—**

“स्त्री–सुलभ लज्जा.” अरेरे, हा लज्जेचा दागिना आम्हां स्त्रियांना देवानें बहाल तरी का केला ? ही लाज नसती, तर प्रकाशांना उघडपणें जें वाटतं तें सांगितलं नसतं कां मी ? पण सांगून तरी काय उपयोग झाला असता ? निष्कारण फजीति माझीच झाली असती. त्यांचं प्रेम निशेवर होतं हेंच खरं ! मीच चुकलें, पारख करायला फसलें. स्वतःच्या मनाची फसवणूक केली.... प्रकाश–प्रकाश–ही इंदू मेली–ठार झाली—

इंदूचा–प्रकाश लोपला.

* * *



## प्रकरण ५ वें

### तळमळ

माझं नांव पुरुषोत्तम ! सौ. वत्सला ऊर्फ मीनाक्षी खरे हिचा मी पती ! माझ्या नैराश्याची अन् वैगुण्याची कहाणी सांगायला मी तुम्हांपुढें उभा आहे.

येथल्या हायस्कूलमध्यें हेडमास्तरच्या जागेवर काम करतों आहे मी ! माझा संस्कृत व्यासंग दांडगा आहे. आणि त्याबद्दल मला अभिमानही वाटतो आहे. संस्कृत शिकायला माझ्याकडे विद्यार्थी अन् विद्यार्थिनी येतात, मीही त्यांना खुलेपणानें शिकवतों.

पण माझ्या खुलेपणाचा परिणाम मात्र घातक झाला ! मुकाट निस्तरतों आहे आतां.

उषा नांवाचीं विद्यार्थिनी माझ्याकडे संस्कृत शिकायला येते. एकदां अशीच नेहमींप्रमाणें आली, पण जातांना एक वही विसरून गेली. मी सहज ती वही उघडली. कांहीं पानें चाळलीं. एका पानावर पाठीमागचे बाजूस पेन्सीलीनें अगदीं बारीक अक्षरांत पुढील मजकूर लिहीला होता—

"प्रेम! पुरुषोत्तमरावांकडे पाहून माझ्या हृद्‌यांत अशा अननुभूत संवेद्ना कां बरं तरळायला लागतात? खरंच, प्रेम म्हणजे काय? पण माझ्या हृद्‌यांत प्रेमाचा शिरकाव झाला असेल तरी कसा? कुणीं शिकवलं मला प्रेम करायला? हो, त्यांनींच; पुरुषोत्तम-रावांनींच! संस्कृत शिकायला म्हणून त्यांच्याकडे जेव्हांपासून मी जाऊं लागले, तेव्हांपासूनच मी त्यांच्याकडे आकर्षिलें गेलें हें खरें आहे. त्या दिवशीं—विप्रलंभ शृंगाराची माहिती देतांना—आणि कालिदासाच्या 'मेघदूत' काव्यांतला तो श्लोक समजावून देतांना— अहाहा! त्या श्लोकाच्या आठवणीसरशीं किती हर्षदायी रोमांच उठतात अंगावर! गुलाबाच्या फुलांच्या ढिगांत, त्या मनोहारी मादक गंध—सुगंधांत जणुं बुडून गेल्यासारखं वाटतं. कोणता बरं श्लोक तो? हो, आठवला.

"नूनं तस्याः प्रबलरुदितोच्छूननेत्रं बहूनाम् ॥
निःश्वासानामशिशिरतया भिन्नवर्णाधरोष्ठम् ॥
हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लंबालकत्वा ॥
दिन्योर्दैन्यं त्वदुपसरणक्लिष्टकान्तेर्बिभर्ति ॥ १ ॥"

पुरुषोत्तमराव विवाहित आहेत. त्यांच्यावर प्रेम करण्यांत मी चुकते आहे कां? छे, मला मुळींच तसं वाटत नाहीं. लग्नाच्या बायकोशिवाय दुसरीवर प्रेम करायला मुळीं अधिकारच नसतो कां पुरुषांना? पोपट कांहीं एकाच कैरीवर चोंच मारीत नाहीं! तसंच आहे हें. मग, माझ्या मनांत पुरुषोत्तमरावांविषयीं प्रेम रुजावं यांत तरी नवल असं काय आहे बरं? आंब्याला मोहोर आला, कीं कोकिळेला

कंठ फुटायचाच ! पण–पण–पुरुषोत्तमरावांची दृष्टी कांहीं ढळत नाहीं मला पाहून ! मला वाटतं त्यांना आपणच एकदां धैर्य करून विचारावं स्पष्टपणें. हो, काय हरकत आहे विचारायला ? पुरुष मानी असतात. त्यांच्या अंतर्यामांत प्रीतीची ज्योत तेवत असली, तरी तिचा प्रकाश सुरवातीला झांकून ठेवण्यांतच खरी करामत वाटते त्यांना ! आणि नाहीं तरी हेंच खरं आहे, कीं किनारा लाटेकडे जाणार नाहीं कधीं; लाटच किनाऱ्याकडे धांव घेते. तें कांहीं नाहीं, आज शिकवणीला गेलें, कीं अगदीं स्पष्ट स्पष्ट विचारून घेणार मी !"

कसली तरी असह्य टोंचणी लागली माझ्या हृदयाला तिच्या वहींतलं हें पान वाचून ! भाबडी पोर; माझं वैगुण्य तिला माहीत असणार तरी कसं ? उषेचा सहवाससुद्धां जाचक होतो मला, पण माझा आव घालवूं तरी कसा या पोरीसमोर ! मी व्यंगी आहे; मला स्वतःला कळतं आहे तें. पण माझं हें व्यंग लोकांना कळत नाहीं तो दोष माझाच आहे कां ?

दुपारीं वत्सलेला–पत्नीला–फुलांची वेणी आणून दिली मी ! मी स्वतः फुलवेडा आहे; मला फुलं फार फार आवडतात. फुलं समोर असलीं म्हणजे विलक्षण आनंद वाटतो माझ्या मनाला. तिला फुलांची वेणी देतांना हाच हेतू होता माझा ! पण ती वेणी पाहून तिचं तोंड खरकन् उतरलं. वाईट वाटलं मला तें पाहून, अन् शरमही वाटली. वेणी घातल्यानंतर बायका जास्त सुंदर दिसतात, आणि पुरुषांच्या मनावर साहजिक मोहाचा पगडा बसतो, पण माझ्या मनावर तसा पगडा बसणंच मुळीं शक्य नाहीं. स्त्री आणि पुरुष !

स्त्रियांच्या भावना आणि पुरुषांच्या भावना!–काय फरक असतो या दोहोंत ? स्त्री आणि पुरूष या दोहोंपेक्षांही कांहीं तरी निराळीच भावना मला जाणवते.

* * *

उषेची बुद्धिमत्ता अन् हजरजबाबीपणा प्रत्ययाला आला माझ्या! शिकवणीला आली होती ती अन् मनाशीं ठरविल्याप्रमाणें तिनें अखेर विचारलंच मला !

" सारासार विचार करून विचारलास कां हा प्रश्न ? " मी तिला म्हणालों.

" या आपल्या प्रश्नाचं प्रयोजन ?" तिनें मला विचारलें.

" मी विवाहीत आहे हें माहीत आहे ना तुला ? " मी.

" समुद्राला एकच नदी मिळते कां ? " सडेतोड सवाल होता उषेचा.

" युक्तिवाद नको आहे मला ! सरळ सांग. " मी म्हणालों.

" हो, आहे माहीत मला. माझ्या जीविताचं वाटोळं होईल अशी पुसटशी जरी कल्पना माझ्या मनाला असती, तर प्रेमच जडलं नसतं मुळीं माझं तुमच्यावर. " बिनतोड उत्तर मिळालं.

पण मी ? मला तें नको होतं. मी टाळाटाळ करित होतों. पण माझ्या त्या टाळाटाळीचा परिणाम कांहींच झाला नाहीं. वत्सलेच्या आयुष्याचं काय होईल हीही भीति मी तिला घातली–पण छे– ' सवती सवती अगदीं खुलेपणानं राहूं ' असं आश्वासन द्यायलाही तयार झाली ती ! मला भयंकर पेंच पडला. शक्य तों टाळाटाळ करण्याच्या हेतूनें मी तिला म्हणालों.

“ प्रेम हें असं उतावीळ नसतं उषे. ”

“ कबूल ! पण प्राणाचीही पर्वा न करतां कड्यांवरून बेगुमानपणें उडी घेणाऱ्या नदीप्रमाणंच बेछूट अन् अमर्याद असतं तें. ” मांडखोलकरी भाषेंत उत्तर दिलं तिनं.

“ तटावरील माती ढांसळून नदीचं पाणी जसं गढूळ होतं, तसं प्रेमही मत्सरानं दूषित होत असतं उषे. ” मीही त्याच भाषेंतून समर्थन करूं पाहात होतों.

“ गढूळ पाण्यानें ओथंबलेल्या नदीला समुद्र उदारतेनें आश्रय देतोच ना ? ” निर्वाणीचे बोल होते तिचे.

पण छे. मला मुळींच पटत नव्हतं तें.

अखेर तिचा स्वर बदलला. पंचमांतला सप्तमांत गेला.

तिचा तो त्यावेळचा अवतार पाहून मी गांगरलों. ही खवळलेली नागीण फूत्कार टाकीत बाहेर जाईल, चार चौघांत झाल्या गोष्टींची वाच्यता करील अन् त्यायोगें कदाचित् माझ्या वैगुण्यावर प्रकाश पडूं शकेल असं मला वाटलं. त्यापेक्षां तूर्त हिच्या इच्छेला रुकार दिला तर ? तूर्तची वेळ तरी मारून नेऊं, मग पुढचें पुढें–असा विचार केला अन् मी म्हणालों—

“ असं वैतागूं नकोस उषे ! तुझं प्रेम किती उच्च थरापर्यंत पोहोंचलं आहे याचा अंदाज घेत होतों मी ! तुझ्यावर माझं प्रेम नाहीं असं कां वाटतं तुला ? ”

पुस्तकांतलीं वर्णनं वाचूनच प्रेम नी प्रणय यांची माहिती झाली मला. प्रत्यक्ष प्रेम नी प्रणय कशाशीं खातात हेंदेखील माहीत नाहीं.

स्त्री–पुरुषांमधील भेद कळत नाहीं. त्यांच्या चमत्कारिक नात्याची कल्पना नाहीं. अशा स्थितींत उषेचा स्वीकार केलेला.—तें सारं पुरुषार्थाचं नाटकच होतं. अव्हेरलं असतं तर कदाचित् तिला माझं वैगुण्य कळून आलं असतं नी नाचक्की झाली असती. नाटक होतं हें खरं; पण तें पुरेपूर तरी वठवायला हवं ?—

मी उषेचा हात माझ्या हातांत घेतला. तिला जवळ ओढलं, आणि—

सुदैव म्हणा, कीं दुर्दैव म्हणा, माझी पत्नी वत्सला आंत आली. तिला तें पाहायला मिळालं.

उषा चपापली, बाजूला झाली, पळाली, निघून गेली. मी मात्र तिच्या दाढेंत सांपडलों.

"मी तुमची लग्नाची बायको ! तिचा हा असा छळ ! आज सहा वर्षांत कधीं माझ्या अंगाला हात लावला असेल तर शपथ. आणि तिला मात्र दिवसाढवळ्या कवटाळतां आहांत कीं ! कांहीं शरम ?" वीज कडाडत होती. तिच्या अंगाची लाही होणं साहजिक होतं;—पण तो दोष माझा होता कां ?

"थांब, बोलूं नकोस ! आधीं आंत जा पाहूं ! माझ्या व्यवहारांत कुणी अशी ढवळाढवळ केलेली खपत नाहीं मला. मी हा असा आहे, मी क्लीब आहे हें माहीत आहे ना तुला ? माझं हें वैगुण्य झांकून ठेवण्यासाठींच मला असं वागणं भाग पडतं समजलीस ! जा, हो चालती."

उसना आव आणून खालच्या मानेनेंच मी म्हणालों अन् माझ्या उद्योगाला लागलों.

* * *

**मीनाक्षी खरेची रोजनिशी—**

सकाळची—साडेदहा वाजण्याची वेळ होती. ते नुक्तेच जेवून वर गेले होते. मी त्यांचें उष्टें काढून ठेवलें व जेवल्याजागीं शेणगोळा फिरवूं लागलें. त्यांची शाळेला जाण्याची वेळ झाली होती. कपडे करून ते खालीं आले आणि बाहेर जातां जातां 'पलंगावरील चादर अन् उशांचे अभ्रे बदलून ठेवायला' सांगून निघून गेले.

आमचीं जेवणं झालीं, उष्टीं—खरकटीं काढून झालीं. खरकटीं भांडीं गोळा करून मी न्हाणींत ठेवलीं, बादलींत मोलकरणीसाठीं हौदांतून पाणी उपसून ठेवलं आणि त्यांनीं सांगितलेलं—काम उरकण्यासाठीं माडीवर गेलें.

माडीवर छोटीशी दोन खणांची खोली आहे. तिथं माझे पती झोंपत असत. मी मात्र खालींच माजघरांत झोंपत असें. या खोलींत किर्लोस्करी कॉट भिंतीला लावून मांडली होती व त्यावर त्यांचा बिछाना घातला होता. उजव्या हाताच्या समोरील कोपऱ्यांत एक कांचेच्या तावदानाचं सुंदर आकाराचं शिसवीच्या लाकडाचं कपाट ठेवलं होतं. त्यांत त्यांची आवडती आणि अभ्यासाचीं पुस्तकं व वरील कप्प्यांत परीटघडीचे नित्याचे वापरण्यांतले त्यांचे कपडे होते. त्यांना लेखन वगैरे कांहीं करायचं असलं म्हणजे, पलंगावर बसूनच ते हीं असलीं बैठीं कामं करीत. कित्येक वेळीं समोर खुर्ची ठेवून, त्यावर आरसा आणि इतर साहित्य ठेवून पलंगावर बसूनच दाढीही करीत. भिंतींवर त्यांच्या वडिलांचा—म्हणजे माझ्या सासऱ्यांचा—मोठा एन्लार्ज केलेला फोटो लावला होता, व नवीन वर्षाचीं कांहीं कॅलेंडरें व कांहीं सुंदर सुंदर चित्रेंही लावलीं होतीं.

मी दार उघडून आंत गेले. उश्या काढून, प्रथम त्यांचे अभ्रे बदलले. मळलेले अभ्रे धुवायला न्यायचे म्हणून ते बाहेर टाकले. स्वच्छ अभ्रयांच्या उश्या खुर्चीवर ठेवल्या अन् गादीवरील चादर ओढून घेतली. गादीवरील धूळ झटकण्यासाठीं मी कॉटवर चढले—गादीवर बसले.

माझ्या हृदयांत एक उर्मी सळसळली. धूळ झटकण्याऐवजीं अनिमिष पण शून्य नजरेनं मी गादीकडे सारखी पाहातच राहिलें. मिळत नसलेल्या सुखाची जाणीव झाली अन् ती जाचक होऊं लागली. शरीरांतल्या रोमरोमांना चिमटे बसत आहेत असं वाटायला लागलं. नेत्रांतून अश्रू ओघळूं लागले. उत्तंगावर जोराचा दाब पडेल तर बरं असं वाटण्याइतकीं तीं ठणठणूं लागलीं. मी माझ्या दोन्हीं हातांनीं घट्ट—घट्ट धरलीं.—अन् अन्—?

समोरच्या भिंतीवर एक राधाकृष्णाच्या रासक्रीडेच्या वेळच्या दृश्याची तसबीर होती. त्याकडे लक्ष गेलं माझं अन् त्यायोगानें होत असलेलं दुःख दुणावलं जास्तच. शृंगाराची जाणीव माझ्या वाढत्या स्त्रीत्वानुसार मला झाली असूनही त्याचा आस्वाद घ्यायला न मिळणाऱ्या—माझ्यासारख्या अतृप्ततेमुळें तळमळणाऱ्या—अभागिनीला ती उत्तान शृंगाराची तसबीर पाहून काय वाटलं असेल—कसल्या वेदना होत असतील हें केवळ कल्पनेनं जाणतां येणं शक्य नाहीं. या मनोव्यथांचं वर्णन करायचं झालं, तरीही शब्द-संभाराच्या अभावामुळं तें अशक्य होईल.

आकाशाला भिडणाऱ्या उंच अशा शिखरावरून वाहात येणारी नदी—ती कधीं तिथंच थांबेल? तिलाही आपल्या स्त्रीत्वाची जाणीव

असतेच कीं ! उंच कड्यावरून बेगुमानपणें उड्या घेत—धांवत ठेंचाळत—कांट्याकुट्यांतून मार्ग काढीत अखेर ती समुद्राकडेच जाते ना ? त्यांतच आपलं व्यक्तित्व विरवून टाकते ती !

मग, मींच असं काय पाप केलं आहे, कीं मला माझ्या स्त्रीत्वाची जाणीव झाली असूनही, मला माझं व्यक्तित्व—व्यक्तित्वांत विरवून टाकायला वाव मिळूं नये ?

जमिनीवर उगवलेली वेल जवळपासच्या झाडावर चढणारच; पण स्वतःचा भारही वाहवायला असमर्थ असलेलं झाड वेलीचा भार कसा सहन करील ?—मग ?—मग, ती वेल तिथून दुसरीकडे जाते—दुसऱ्या झाडावर चढते—फुलते—फळते.

आणि मी ?—

धर्माचं—रूढीचं बंधन म्हणून ?

पण निसर्गाचं बंधन जाचतं आहे ना ?

चिखलांत जन्मलेलं सुंदर कमळ—त्यालाही भुंग्याच्या सह-वासाची हांव आहेच कीं ! भ्रमर मकरंद सेवायला येतो—जीवनां-तला रस सेवायला भ्रमर आला असूनही साऱ्या पाकळ्या मिटून घेऊन जीवनांतला रस सेवून घ्यायला पूर्ण मुभा देणारं तें कमळ !

कुठं तें कमळ आणि कुठं तळमळणारी मी ? तें पंकज—आणि—मीही पंकजच ! तें प्रेमपंकज आणि मी—???

आकाशांतल्या सुंदर तारका ! अमावास्येला कशा सारख्या चमचमत असतात ! पौर्णिमेच्या रात्रीं कधीं त्यांना तितकं चम-

चमतांना पाहिलं आहे कुणी ? त्यांचा उजेड नाहीं पडत, पण चमक कशी पौर्णिमेपेक्षां जास्त दिसून येते अमावास्येला ! जणूं त्या साऱ्या जगाला 'आज आमचा नाथ–आमचा चंद्र कुठें गेला ?' असं विचारीत असतात. आणि अमावास्येला तळपणाऱ्या या इवल्या–इवल्याशा तारका पौर्णिमेला त्या चंद्रापुढें कशा अगदीं फिक्या दिसतात–नव्हे, होतात. स्वतःचं व्यक्तित्व त्या चंद्रांत विलीन करून टाकतात.

स्वतःचं व्यक्तित्व दुसऱ्यांत विलीन करून टाकण्याची केवढी हांव ती ! केवढी ओढ लागलेली असते त्यांना चंद्राची ? ओढ !–होय ओढच ! या ओढणीमुळेंच साऱ्या जगाचा व्यवहार सुरळीत चालला आहे. ही ओढणी आहे म्हणूनच एकजण दुसऱ्याची पर्वा करतो, आणि ही सारी ओढणी–साऱ्या ओढणीची जबरदस्त ताकद–असीम शक्ति–ही केवळ आयुष्याच्या मध्यार्धातच–तारुण्यांतच मनुष्याच्या अंगीं येते.

"तारुण्यांत माणसाच्या अंगांतील रक्ताचं मद्य होत असतं नेहमीं !" श्री. माडखोलकरांचे हे उद्गार खरे आहेत अगदीं.

तारुण्य ! तारुण्यांतच माणसांच्या अंगांतील रक्त सळसळत असतं. 'मी काय करूं आणि काय नको' असं होऊन जातं तेंही तारुण्यांतच ! साऱ्या जगाला केवळ आपल्या नजरेच्या एकाच फिरकीनं स्तिमित करूं, साऱ्या जगाला स्वसामर्थ्याच्या जोरावर आपल्या हाताच्या बोटावर आपण नाचायला लावूं असा विश्वास वाटूं लागतो तोही या तारुण्यांतच ! किती धडपड धडपड चालते यावेळीं ! किती उत्साह सळसळत असतो यावेळीं ! साऱ्या

जगांत आजपर्यंत घडून आलेल्या साऱ्या साऱ्या घडामोडी, साऱ्या एकूणएक क्रान्त्या, सर्व कांहीं या तारुण्यांतल्या रक्तामुळेंच घडून आलं आहे, येत आहे आणि येत जाणार! अनिष्ट रूढींचीं, धर्मांचीं, सारीं सारीं बंधनं अंतिम सुखाशेसाठीं धडपड करणाऱ्या या तारुण्यांतील सळसळत्या रक्तानेंच तडातड्‌ तोडून टाकलीं आहेत. साऱ्या जगानें आपल्या भोंवतीं स्तिमित होऊन गरगरां फिरत राहावं आणि आपणही साऱ्या जगाला एकसारखं फिरवीत राहावं असं याच वयांत वाटत असतं. हेंच वय धावण्याचं–उड्या मारण्याचं–पराक्रमाचं! पुढं होणार काय? आणि विचारतो तरी कोण अंगांतला जोम गेल्यावर अन्‌ उत्साह नष्ट झाल्यावर?

कुणीतरी भिन्नालिंगी समवयस्क व्यक्ती भेटावी, तिनं आपल्या कृत्याची प्रशंसा करावी–कौतुक करावं, मायेनं आपल्याला जवळ घ्यावं, कुरवाळावं, थोपटावं, त्याच्यांत आपण लय पावावं असंच यावेळीं वाटतं!

आणि मी? मला नाहीं का तसं वाटत?

पण वाटून काय उपयोग?

* * *

## इंदुमती खरेची रोजनिशी—

उषेचें आगमन! सर्वांनाच सुखदायक असतें का हें उषेचें आगमन? मुळींच नाहीं. कित्येकांच्या हृदयांत नूतन प्रेम, उत्साह, नव्या नव्या आशा–आकांक्षा यांना जन्म देतें, तर कित्येकांच्या चिरवांछित आशा-आकांक्षांवर, प्रेमावर, सुखावर विरजण घालतें.

कित्येकांचे आर्द्र लोचन सुखाच्या शांत शीतल पवनानें समाधान पावतात, तर कित्येक व्याकूल होऊन अश्रूंचा वर्षाव करीत असतात. नवोउन्मीलितकमलपुष्पाप्रमाणें कित्येक प्रफुल्लित होतात, तर सुकून गेलेल्या गुलाबपुष्पाप्रमाणें कित्येक निस्तेज होतात.

प्रभातकाळचा पवन सुखद अन् मोहक तर खराच, पण मला तो दुःखद अन् भकास वाटत होता. पाखरांची किलबिल ऐकून हृदय प्रफुल्लित होण्याऐवजीं विदीर्ण होत होतें. माझें मन स्थिरही नव्हतें आणि शांतही नव्हतें.

  

मनाला भुरळ पाडणाऱ्या समुद्राचें पाणी खारें, ज्याच्या वासानें मन मोहित होतें त्या गुलाबाला कांटे, अनुरूप अन् अनुरक्त युव-युवतींच्या अंतःकासारांत प्रणयाच्या वीचि उसळविण्यास समर्थ असणाऱ्या शांत चंद्राला कलंक, जीवनाला पोषक असलेल्या अग्नीला धूर, तद्वत शुद्ध निरपेक्ष प्रेमाला विरह हा असायचाच का ?

प्रेम मत्सरी असतं म्हणतात ! मला नाहीं खरं वाटत तें. तसं असतं, तर प्रकाशांच्यावरील माझं प्रेम कमी झालं असतं. पण तें तसं नाहीं म्हणूनच माझ्या विरहवेदना क्षणोक्षणीं वाढतच आहेत.

विरहवेदना ! दुःसह आहेत त्या अगदीं. सहस्र विंचवांनीं एक-समयावच्छेदेंकरून मला एकाच ठिकाणीं नांग्या मारल्या आहेत इतक्या असह्य वेदना होऊं लागल्या. विद्युत् स्पर्शाचा झटका रोमरोमांना बसला आहे कीं काय असें वाटूं लागलें. काळजांतून कोणी तरी कांहीं तरी काढून घेत आहे—तोडून घेत आहे असें होऊं

लागलें. मर्मांतिक वेदना मर्यादातीत गेल्या. हृदय विकल झालें. काळीज कापूं लागलें.

वेदना ! वेदना ! ! वेदना ! ! !

असह्य झाल्या या वेदना ! सांगूं तरी कुणाला माझ्या या मनोव्यथा ? कोणाला माझ्या या मनोव्यथांची जाणीव होईल ? कोण हळहळेल माझी ही मनोव्यथा पाहून ? माझ्या स्फुंदनाबरोबर कोण स्फुंदेल ?

ज्यानें आपलें हृदय प्रेमपात्राच्या पदकमलावर अर्पिलें आहे, त्यालाच माझ्या मनोव्यथांची जाणीव होईल. ज्यानें आपल्या काळजावर दगड बांधून प्रेमप्राप्तीसाठीं प्राणही वेंचला आहे, तोच माझी ही मनोव्यथा पाहून हळहळेल. देहभान विसरून गोड, सुरेल संगीताचा ताल धरण्यासाठीं तीक्ष्ण धारेच्या तरवारींच्या पात्यावर जो नाचला आहे, तोच माझी ही स्थिति पाहून कळवळेल. हृदय फाडून ज्यानें आपल्या प्रेमपात्रास दाखविलें आहे, प्रेमवंचनेनें प्रेमयाचक बनून प्रेमभिक्षेस्तव हृदयाची झोळी हातांत घेऊन जो आपल्या प्रेमपात्राच्या दारांत तिष्ठला आहे, दारावर मस्तक आपटून आपटून जो घायाळ–बेशुद्ध झाला आहे, त्यालाच माझ्या मनोव्यथांची जाणीव होईल, तोच माझ्या स्फुंदनाबरोबर स्फुंदेल–रडेल–आणि धीरही देईल मला. निराशेच्या आत्यंतिक वावटळींतही ज्याच्या हृदयांतील प्रेमज्योत विझली नाहीं, त्यालाच माझ्या प्रेमप्रलापाच्या श्रवणानें पाझर फुटेल, तोच सहानुभूतीनें माझ्या पाठीवरून हात फिरवील, आणि " उगी, उगी हं. " असा धीर देईल.

माझ्या खऱ्या स्थितीची जाणीव नसल्यामुळें लोक मला 'पापी' म्हणतील. माझ्या मनांतला भाव, अंतःकरणांतला दाह न समजल्यामुळें लोक माझा तिरस्कार करतील. करोत बिचारे ! सहानुभूतीच्या अभावामुळेंच माणुसकीच्या मर्यादा तुटतात ! आपल्याला सुळावर चढविणाऱ्या लोकांबद्दल ख्रिस्तानं काढलेले उद्गार प्रसिद्धच आहेत–

"Father forgive them; for they know not what they do ..."

ज्याच्या हृदयाकाशांत प्रेमनक्षत्रांचा उदय झाला नाहीं, ज्यांच्या मनोरूपी मरू–भूमींत प्रेमजलाचा शिडकाव झाला नाहीं, ज्यांच्या मानससरोवरांत प्रणयपद्म विकसलें नाहीं, ज्याला प्रेम म्हणजे कांहीं आहे हें माहीत नाहीं, प्रेमरसाचा आस्वाद ज्यानें कधीं घेतला नाहीं, अशाश्वत सुखापासून विरक्त होऊन शाश्वत प्रेमासाठीं प्रेमपात्राचा जो अनुरागी बनला नाहीं, प्रेमपाशांत विश्रब्ध–विबद्ध होऊन–कैद झालेल्या पिंजऱ्यांतल्या पक्षाप्रमाणें जो तडफडला नाहीं, प्राणापेक्षांही प्रेमप्रतिमेस ज्यानें कधीं अधीक मानलें नाहीं व एकच एक वेळ दुरून कां होईना, पण त्या प्रेमप्रतिमेच्या दर्शनासाठीं जो उत्सुक झाला नाहीं, तेवढ्यासाठीं ज्यानें आपल्या प्राणाचें मोल देण्यास कुचराई केली, क्षुधा असूनही समोरच्या पंचपक्वान्नांचा त्याग करून अविरल अश्रुभरित नेत्रांनीं ज्यांनीं प्रेमप्रतिमेवरील दृष्टी अढळूं दिली नाहीं, तोच मला हंसेल, माझी निंदा करील, माझ्या दुःखाकडे कानाडोळा करील. माझा तिरस्कार करील—

प्रेम ! प्रेमाची उपासना करणें, प्रेमाची पूजा करणें हें पाप आहे कां ? सौगंधयुक्त सुंदर फूल पाहून मोहित होणें, दुधासारख्या

पांढऱ्याशुभ्र अशा धवल किरणांनीं युक्त असलेल्या शरदृतूंतील चांदण्यांतून मनमुराद विहरणें, लाटांच्या मंजुळ मंजुळ स्वरांनीं देहभान हरविण्यास समर्थ असणाऱ्या सुंदर नदीच्या तीरावर बसणें, स्वच्छ नीलोज्वल अफाट अस्मानाकडे टक लावून पाहाणें, वसंतांत मोहोरांनीं विशोभित झालेल्या आम्रवृक्षाच्या डहाळीवर बसून गाणाऱ्या विहंगसम्राज्ञी कोकिलेचा सुरेल आलाप ऐकून मुग्ध होणें— या सर्वांत पाप आहे कां ? मला तसं वाटत नाहीं. पापही नाहीं आणि पुण्यही नाहीं यांत ! प्रेम हें पापपुण्यातीत आहे.

ज्याच्या अंतर्यामांत प्रेमाचा दिव्य स्फुल्लिंग स्फुरला त्यानें खुशाल त्याची आराधना करावी. प्रेम परमेश्वरस्वरूप आहे. आपण परमेश्वर-प्रतिमेची पूजा करतों, मग प्रेमप्रतिमेची कां पूजा करूं नये ? त्यांत पाप कसचें ? मेघाकडे पाहून मयूर आनंदानें नाचतो, चकोर एकाग्र-चित्तानें चंद्राकडे पाहातो, दिव्याच्या ज्योतीवर पतंग आपण होऊन झडप घालतो.—स्वतः दग्धही होतो; मग यांत पाप आहे कां ? दोन ग्रहांचें युति—उल्लेखाप्रमाणेंच पिधान होतें यांत पाप आहे कां ?—भक्तीच्या सोपान परंपरा चार आहेत म्हणतात—सलोकता, सरूपता, समीपता आणि सायुज्यता ! मग उत्कटत्वानें सायुज्यांत मीलन होणें पाप आहे कां ? पतंगाप्रमाणेंच प्रेमाच्या उत्कटत्वानें दग्ध होण्यांतच जीवनाचें सार्थक आहे.

**“ कुठें ज्योति ? कुठें पतंग परि तो ज्योतीवरी घे उडी ।**
**सायुज्यांत अभेद्य मीलन भले, जावो जळोनी कुडी ॥ ”**

  

आत्मा हें एक उज्वल रान आहे. प्रेमाच्या प्रवेशानें यांत तेज आणि प्रकाश यांची प्रभा फांकते. मानवी हृदयाची उत्पत्ति प्रेमासाठींच झाली आहे, त्याची स्थितीसुद्धां प्रेमावर अवलंबून आहे, आणि लयसुद्धां प्रेमामुळेंच होतो !

मानवी जीवनाचें कर्तव्य प्रेम ! जीवनाच्या आस्तित्वाचा उद्देश प्रेम ! मानवी अंतःकरणाचा प्रारंभ प्रेमानेंच झाला. अतएव प्रेमप्रकर्षांत दंग होऊन आयुष्याचा व्यय करीत राहणें हेंच सर्वस्वीं उचित आहे. मग त्या प्रेमाच्या प्राप्तीस्तव आत्मसमर्पण करावें लागलें तरी हरकत नाहीं.

  

प्रेमी प्रेमच इच्छितों. प्रेम प्रेमास्तवच केलें जातें. प्रेमाचा परिणाम प्रेम आहे, प्रेमाचा पुरस्कारही प्रेमच आहे, आणि प्रेमाचा उपहारही पण प्रेमच आहे.—प्रणय प्रणयाची सामुग्री आहे, प्रेम प्रतिमेची आपल्या हृदयसिंहासनावर प्रतिष्ठापना करून तिची अष्टौप्रहर पूजा करीत राहणें हेंच खरें शुद्ध प्रेम आहे. प्रेमाचें निरंतर ध्यान करणें, विसरण्याचा प्रयत्न करूनही न विसरणें हेंच खरें यथार्थ प्रेम आहे.

  



## प्रकरण ६ वें

### अभिसार

**निशाचें हृत्कथन:—**

माझ्यावर प्रेम असल्याबद्दलचं प्रकाशांचं पहिलं पत्र वाचलं, त्यावेळीं मला प्रकाश इतके धाडसी अन् साहसी असतील याची कल्पनाच झाली नाहीं. माझ्यासारख्या एका उपभुक्त स्त्रीशीं विवाह करण्यांत प्रकाशांनीं खरोखरीच आपलं अजब धैर्य निदर्शनाला आणलं आहे. इतर पुरुषांसारखेच हेही एक कामुक वृत्तीचे नरपुंगव असावेत असंच मला त्यांचं तें पहिलं पत्र वाचल्यावर वाटलं. त्यानंतरचं तें "ओलेती" चित्राच्या वेळचें कृत्य !

पण त्यांच्या अंतःकरणाची थोरवी मला कळून आली ! माझ्याशीं लग्न करण्याची इच्छा जेव्हां त्यांनीं प्रकट केली तेव्हां त्यांच्या विषयींचा माझ्या मनांतला आदर वृद्धिंगत झाला. अन् त्या साहसी पुरुषाबरोबर जर आयुष्य व्यतीत केलं, तर कांहीं तरी सार्थक होईल जिवाचं असं वाटलं ! आणि मी लग्नाचा निश्चय केला.

प्रकाशबरोबर लग्नबंधनानं जखडून घेण्याचा मी माझा निश्चय जेव्हां आईजवळ बोलून दाखविला, तेव्हां ती किती रागावली माझ्यावर ! स्वतःही रडली ! अनेक तऱ्हांनीं सांगून पाहिलं तिनं ! मी लग्नापासून परावृत्त व्हावं याबद्दल किती तरी खटपट केली तिनं ! हवं तर रोज प्रकाशांना घरीं घेऊन येत जा असंही ओंगळपणें बोलून दाखवायला कमी केलं नाहीं तिनं !

तिचे ते त्यावेळचे उद्गार ऐकून मला तिचा अतोनात राग आला—तिरस्कारही वाटूं लागला तिच्याबद्दल. तिच्या उद्गाराची शिसारीसुद्धां आली मला. ही माझी आई आहे असंसुद्धां म्हणायला मला नको वाटूं लागलं होतं.

पण आतां आईचे त्यावेळचे उद्गार ऐकले असते तर फार बरं झालं असतं असं वाटूं लागलं. एका चांगल्या माणसाच्या आयुष्या-वर लग्न करून मी निखारे ठेवले आहेत याबद्दलची जाणीव आतां माझ्या मनाला झाली अन् वाईट वाटूं लागलं.

* * *

आईकडे येणाऱ्या शेटजींचा व्यापार मोठ्या प्रमाणावर होता. त्यांची पेढी होती. चांदी, सोनें, जडजवाहीर यांची मोठ्या प्रमाणावर देवघेव करीत असत.

कुठें नी कशांत ठोकर आली तें कांहीं कळलं नाहीं. पण लौकरच दिवाळं काढण्याची त्यांच्यावर पाळी आली. तसं ते बोलूनही दाखवीत कधीं कधीं !

सार्‍या आयुष्यांत मानमरातबानं ज्यांनीं व्यापारांत लौकिक मिळविला त्यांना आतां जीवसुद्धां नकोसा वाटूं लागला. आणि साहजीकही होतं तें !

रोज रात्रीं त्यांनीं याबद्दल आईजवळ बोलावं—दुःख ओकावं असा क्रम होता.

एके दिवशीं काय झालं कोण जाणे, ते आईकडे नेहमींप्रमाणेंच आले, अर्धी-एक रात्र नेहमींप्रमाणें त्यांनीं घालविली म्हणे; नंतर त्यांनीं दूध प्यायची इच्छा दर्शविली. दूध तयार होतंच. आईनं त्यांना दूध तापवून दिलं. नंतर ती बाजूला झाली. त्यांनीं आपल्या कोटाच्या खिशांतून कसलीशी पुडी काढली; ती त्या दुधांत घातली अन् शांतपणें ते दूध प्याले.

जुलाबाची पुडी आहे असं आईला त्यावेळीं त्यांनीं सांगितलं. आईलासुद्धां तें खरं वाटलं.

पण दुर्दैव आईचं—ती विषाची पुडी होती. आईचं पाप आईपुढें उभं राहिलं.—

सकाळीं उठल्यानंतर ती नेहमींच्या उद्योगाला लागली. बराच वेळ झाला, तरी शेटजी कां उठेनात म्हणून ती त्यांना उठवायला गेली, तों त्यांचा आत्मा शरिरांतून नाहींसा झालेला तिला आढळून आला.

* * *

आईला अटक झाली होती. सध्यां ती जामिनावर मोकळी आहे. तिच्यावर ‘ शेटजींना विष घालून मारलं ’ असा आरोप ठेवला आहे.

या आरोपांतून मुक्त होण्याला तिला फक्त आतां एकच आधार होता, आणि तो म्हणजे डॉक्टरांचा !

पण डॉक्टरांनीं आईजवळ भलतीच अट सांगितली.

डॉक्टरांची इच्छा पुरी करणं म्हणजे प्रकाशांच्या आयुष्यावर जळजळीत निखारा ठेवणंच होय !

डॉक्टरांना मी हवी होते ! माझं सौंदर्य डॉक्टरांना हवं होतं ! आणि तेवढीच अट त्यांनीं आईला घातली होती.

आईनें डॉक्टरांना माझं लग्न झाल्याचं सांगितलं, पण मग ते तयार होईनात ! ते आईला म्हणाले—" कसलं लग्न नी कसलं काय? तुम्हां लोकांत सारं सारखंच. पहा बुवा, तुम्ही माझी ही इच्छा तृप्त करा, मी तुमच्या बाजूनं जबाब देतों नी तुमची मुक्तता होईल अशी खटपट करतों. " अखेर आईचा नाइलाज झाला, अन् तिनें मोठ्या कष्टानें माझ्याजवळ ही हकीकत सांगितली. माझ्यापुढें पेंचप्रसंग निर्माण झाला.

आईची मुक्तता ! डॉक्टरची इच्छा !! प्रकाशांचं आयुष्य !!!
—साऱ्या गोष्टी माझ्या मनाला जाळीत होत्या.

* * *

आई कुणाला नको आहे कां ? मी आईसाठीं तें कृत्य केलं ! नरकांत मी होऊन पाऊल टाकलं. डॉक्टरांची पाशवी इच्छा केवळ आईच्या मुक्ततेसाठीं मी तृप्त करायला तयार झाले. प्रकाशांना कुठलीही गोष्ट कळून येऊं नये याबाबत मी फार खबरदारी घेतली. अन् पंधरा दिवस परत येणार नाहीं असं प्रकाशांना सांगून मी आईकडे निघून आले.

* * *

## प्रकरण ७ वें

### उद्वेग

**इंदुमती खरेची रोजनिशी—**

आई, वडील, बहीण, भाऊ कितीतरी व्यक्तींच्या सहवासांत मनुष्य वाढतो. या सर्वांबद्दल त्याच्या मनांत सारख्याच प्रमाणांत ममत्व असणं शक्य नाहीं. त्याच्या अंतर्यामांतील ममतेचा जास्तींत जास्त भाग कधीं आईच्या वांटणीला जाईल, तर कधीं बहिणींच्या अगर भावांच्या, अथवा अन्य व्यक्तीच्या वांटणीला जाईल. पण हें सारं ममत्व उपजत असतं. तें आपोआपच रुजलेलं अन् वृद्धिंगत झालेलं असतं. पुढें, वाढत्या वयांत, जगांतल्या चांगल्या वाईटाची ज्यावेळीं त्याला जाणीव व्हायला लागते, अन् त्याबद्दल सारासार विचार करण्याइतकें त्याचें मन जेव्हां परिपक्व झालेलें असतें, तेव्हां—त्यावेळीं—त्याचे मनांत एकाद्या व्यक्तीविषयीं निर्भेळ ओढ लागली, म्हणजेच त्याच्या अंतर्यामांत खऱ्या सात्विक भावनांची परमावधी झालेली दिसून येईल.

ही सात्विक भावना म्हणजेच खरें–शुद्ध–निर्मळ–निरपेक्ष प्रेम !

* * *

आपल्याला एकादं विसांव्याचं स्थान हवं आहे, अन् तेंही पण अति जवळचं–जिव्हाळयाचं असं हवं, असं कुणाला वाटणार नाहीं ? सर्वांना वाटतं.

अंतःकरणांत उफाळणारे–आंत आंत कढणारे–भाव कुणाजवळ व्यक्त करायचे ? आपल्या सोबत्याजवळ ! स्नेह्यांजवळ !

मैत्री–मैत्री हवी ! पण ती अति सान्निध्याची–जिव्हाळयाची हवी ! मैत्रीविना प्रेमाचे पाश व्यक्तीला जवळ ओढूं शकत नाहींत.

बापाला मुलाबद्दल प्रेम वाटत नाहीं असं कधीं झालं आहे कां ? पण बापाच्या मनांतील प्रेमापोटीं मैत्री नसते, म्हणून मुलगा आपल्या अंतर्यामांतील गूढ अन् गाढ भाव उकलून दाखवूं शकत नाहीं. मुलगा बापाजवळ जें व्यक्तवीत नाहीं तें नात्यागोत्यापासून दूर असलेल्या मित्राजवळ व्यक्तवितो यांतील मर्म तरी हेंच आहे. संसारांत प्रेम हवं; पण मैत्रीविना असलेलं कोरडं प्रेम नको. हें असलं स्नेहजलाविना वाढलेलं प्रेमाचं रोपटं जित्या जिवाची जिवंत-पर्णींच तिरडी बांधायला कारणीभूत होऊन राहतं.–मग–मग प्रेम आणि मैत्री यांचा एकोपा असायला हवा म्हणजे संसार सुखाचा होतो. मैत्रीशिवायचं प्रेम कुचकामाचं आहे.

प्रेमही हवं नी मैत्रीही हवी, पण–पण—

प्रेम नी मैत्री यांचा एकोपा असलेल्या अंतःकरणाची सोबत मला मिळेल काय ? हें एकाकी जीवन व्यतीत करायला नको

वाटतं आहे. आयुष्याला जोड हवी–सोबत हवी आहे, आणि ती जोड–सोबत उपरिनिर्दिष्ट अंतःसाक्षीचीच हवी !

अशी अंतःसाक्षीची जोड–सोबत मला...???

* * *

जग म्हणजे शाळा आहे. या जगाच्या शाळेंत व्यवहाराचे धडे घोकून समृद्धीच्या आणि सुखाच्या पदव्या मिळविण्यासाठीं धड-पडायचं असतं. त्यांत कधीं नापास होण्याचाही प्रसंग येणारच ! पण म्हणून डगमगून कसं चालेल ?

बेडरपणानं जगांत वावरायचं ! जगासारखंच मला वावरायचं !

* * *

दिवस येतात आणि जातात.

आयुष्यांत बदल नाहीं, क्रांति नाहीं, कांहीं नाहीं ! रोज रोज तेंच तें न् तेंच तें ! स्वहृदयाचा भेद करण्याला समर्थ असणारी परनेत्रांतील चमक नाहीं, भुवयांचा वक्र नाच करायला लावणारा व सर्वांगावर कांटेरी कुंपण उठवायला समर्थ असणारा तेजोवलय नाहीं.

कुणी आपल्या नयनांतील दीप्त–किरणांनीं माझ्या अंतःकरणांत अखंड प्रकाश पाडूं शकेल काय ? प्रकाश–प्रकाश—होय, माझ्या अंतर्यामांत प्रकाश हवा आहे.

प्रकाश ! प्रकाश ! !—

* * *

पावसाळ्यांतील अमावास्या ! काळ्याकुट्ट ढगांनीं सारं आकाश भरून यावं, पावसाच्या सरीवर सरी ओसरूं लागाव्यात, मेघांच्या गडगडाटांनीं कर्णरंध्रं किटून जावींत अशा भयाण वातावरणांत मधूनच एकादी वीज चमकावी आणि आजूबाजूचा अंधार नाहींसा व्हावा—

साऱ्या दिशा प्रज्वलित करणारी ती वीज फार वेळ टिकून राहते कां ? एकच क्षण—त्या तेवढ्या एका क्षणांत साऱ्या दशदिशांतला अंधार नाहींसा करते अन् लगेच लुप्तप्राय होते. पुन्हां चहूंकडे अंधार—काळाकुट्ट अंधार—भयाण भीषणता—!

दिवसेंदिवस आयुष्यांतली निराशा वाढत होती. आयुष्याचा वणवा पेटला अशी भासावस्था निर्माण झाली होती. मेंदूची कार्यक्षमता नष्ट—लुप्तप्राय झाली होती, तरीही एकाद्या वेळीं विचार यायचा कीं,—

येतील, कधींतरी प्रकाश माझ्याकडे येतील, मला जवळ घेतील, माझा हात हातांत घेतील, तांबूलविलसित ओष्ठद्वय माझ्या कपोलावर हलकेच ठेवतील अन् गोड कर्णमधुर आवाजांत बोलूं लागतील,...??

छे ! स्वप्न आहे नुसतं ! कुठलं हें असलं मीलन आतां ? हें गोड मीलन—नव्हे, स्वप्न—पण तेंही फार काळ टिकत नाहीं. लगेच विरून जातं.

स्वप्न—क्षणभर टिकतं तें स्वप्न ! त्या स्वप्नांतलं तें गोड मीलन साऱ्या शरिराला फुलकित करतं—पण हाय—तें सारं स्वप्नच !

क्षणाभरानं तें स्वप्न विरतं–लुप्त होतं आणि पुन्हां भयाण निराशा ! निराशाव्याप्त वणवा ! !

*       *       *

मीठ–भाकरी ! मीठ–भाकरी ! ! मीठ भाकरी ! ! !

काय विलक्षण स्तोम माजवलंय् या मीठ भाकरीचं ? ‘ आम्हांला मीठ भाकरी मिळाली, कीं पुरें ’ असे समाधानानें उद्गार काढणार किती तरी लोक आहेत.

पण खरंच, नुसत्या मीठ भाकरीवर राहायचा प्रसंग आला तर ?–

मीठ भाकरीचं विलक्षण स्तोम माजविणाऱ्या या साऱ्यांना विचारा, कीं कशाला तुमच्या ताटांत ही इतर पदार्थांची गर्दी ?– त्या चटण्या, त्या कोशिंबिरी, त्या भाज्या, ती कढी, तें सांबार, ती आमटी—काय हो यांची आवश्यकता ?

नुसत्या मीठ भाकरीनं कां कांहीं होणार आहे ? सारं हवं असतं, पण बोलून व्यक्तवायचं नसतं एवढंच !

जीवनाला साऱ्यांची आवश्यकता आहे. सारे व्हिटॅमिन्स हवे आहेत.

जीवन सुखदायी व्हायला आईच्या प्रेमाची जितकी आवश्यकता तितकीच वडिलांच्या प्रेमाचीही आवश्यकता आहे, तितकीच भावांच्या–बहिणींच्या प्रेमाचीही आवश्यकता आहे आणि तितकीच किंबहुना त्याहूनही जास्त प्रीतीची–तारुण्यांतील साऱ्या सुप्त शक्ति उसळून जागृत करणाऱ्या अखंड अभिनव प्रीतीची आवश्यकता आहे.

नुसती मीठ भाकरी नको आहे !

*        *        *

दोन वाजले होते रात्रीचे.

खडबडून जागी झालें मी. दिवा लावला अन् त्या दिव्यांतल्या ज्योतीकडे टक लावून पाहूं लागले.

माझ्या निद्रेचा नाश व्हायला तसंच भयंकर स्वप्न पडलं होतं मला.

पाण्यानें दुथडी भरलेली नदी संथपणें वाहाते आहे. कडेला सुंदर हिरवळ वाढलेली आहे, त्याशेजारींच भव्य सुवर्णमय मंदीर दिसतं आहे. त्या मंदिराचा तो गगनभेदी कळस--सारं सारं अगदीं नयनरम्य होत.

मी त्या पवित्र नदींत स्नान केलं, शुचिर्भूत झाले. पवित्र वस्त्रें परिधान केलीं, हातांत पूजेसाठीं तबक घेतलं, त्यांत फुलं-( माझ्या कादंबऱ्या )-घातलीं, निरांजनं ठेवलीं आणि मंदिराकडे मंदिरांतल्या देवाची पूजा बांधायला निघाले.

मंदिरांतला देव ! मला लांबूनसुद्धां स्पष्ट दिसत होता मंदिरांतला देव ! तो देव माझा आवडता होता. त्या देवाचा चेहरा थेट प्रकाशांच्या सारखा होता.

तो देव—नव्हे, देव नव्हे—प्रकाशच होते ते !

अतिशय उत्साहानं मी त्या मंदिराजवळ गेलें. पायऱ्या चढूं लागले. सारं लक्ष देवाकडे—प्रकाशांकडे—होतं. साऱ्या पायऱ्या

चढून झाल्या. आतां, आंत–मंदिरांत पाऊल टाकणार तोंच–तोंच तें मंदिर दुभंगलं. पार उलथून पडलं–ती मूर्ति दिसेनाशी झाली ! सारंच उजाड मैदान दिसूं लागलं.

अंतर्यामांतील प्रेममूर्ति दुभंगून गेली, पार उलथून पडली–आतां कुणाची पूजा करूं ? कुणाला तीं तबकांतलीं सुमनं–भावसुमनं –वाहूं ? अश्रूंच्या अभिषेकानं कुणाला न्हाणून काढूं ?

*　　　*　　　*

जीवनांतला प्रकाश लोपला ! माझा जीवनाधारच तुटला. माझे प्रकाश गेले—दूर झाले माझ्यापासून !

प्रकाश गेले; प्रकाशांच्या बरोबर सारेंच जग माझा त्याग करून निघून गेलें. मी मात्र एकटी–एकटी आहे. भयाण, ओसाड, निर्जन अरण्यांत एकटी पडली आहे इतका मला वैताग–उद्वेग आला आहे स्वतःचा.

*　　　*　　　*



# प्रकरण ८ वें

## भूक

**सौ. वत्सला ऊर्फ मीनाक्षी खरे—**

मी गुणवंतरावांच्या घरीं गेलें होतें.

मी आणि गुणवंतराव यांच्यांतला आपपर भाव आतां नाहींसा झाला होता. मी त्यांना सांगत होतें—

" उषेचं चुंबन घेतांना मी त्यांना पाहिलं. शोभतं कां हो हें त्यांना ? माझ्या जिवाचा तर सत्यानाश झालाच; पण आतां त्या पोरीच्या जिवाचा पुन्हां कां बरं सत्यानाश करायचा ? मी त्यांना तसं स्पष्ट विचारलंही—तर वर शेखी मिरवून—' माझं वैगुण्य झांकून ठवण्यासाठींच मला असं वागणं भाग पडतं ' असं स्पष्ट उत्तर दिलं

त्यांनीं. गुणवंतराव, किती दिवस छळ सहन करायचा हा ? जीव अगदीं नकोसा झाला आहे पहा ! मी त्यांची लग्नाची बायको, लग्न झाल्यापासून सहा वर्षं झालीं, कधीं त्यांनीं माझ्या अंगाला हात लावला असेल तर शपथ ! आणि त्या परक्या पोरीच्या गळ्यांत कसा हो हात टाकवला यांना ? शिकायला येणाऱ्या पोरींपैकीं किती पोरींना फसवलं असेल देव जाणे ! डोळ्यांदेखत घडलेली गोष्ट ! यांना हे थेर करायला—तें कांहीं नाहीं; करायचं आहे काय इथं राहून ? मी आपली माहेरीं जाते." आणि ढसढसां रडूं लागले मी.

"तुम्ही माहेरीं जाणार ? मी...इथं..." गुणवंतराव अडखळले. पुढं बोलवेना त्यांना.

मी इथं असतांना—खरंच गुणवंत—माझे गुणवंत इथं असतांना मी जाऊं तरी कशी माहेरीं ? हो, उषेला कवटाळण्याचं यांनीं ढोंग केलं. या सुखाची आसक्ती नसतांनाही त्यांनीं उषेच्या गालावर उदयास्त केला, मग मला या सुखाचा हव्यास असतांना मी तरी गुणवंतरावांच्या आहारीं कां जाऊं नये ? लग्नांत सप्तपदीच्या वेळीं घेतलेल्या शपथा यांनीं पाळल्या आहेत का ? मग मी तरी हें लग्नबंधन कां पाळूं ? माझ्या साऱ्या सुप्त शक्ती चेतल्या होत्या—आग असह्य झाली होती. भावनेची प्रखरता वाढली होती. ती इतकी परिणत झाली होती, कीं त्या भरांत—त्या उन्मादांत मी गुणवंत-रावांचा हात धरला आणि त्यांना प्रेमभरानें हांक मारली—
"गुणवंतराव."

त्यांच्याही मनावरचा ताबा नाहींसा झाला होता. पूर्ण भावना-विवश झाले होते ते. त्यांनींही प्रेमळपणें मला हांक मारली—
“ वत्सलाबाई. ”

“ गुणवंतराव—नाहीं, गुणवंतराव नाहीं—गुणवंत ” मी म्हणाले—

“ खरंच, वत्सला—वत्सू—” ते म्हणाले. अन् माझा हात जास्तच दाबला त्यांनीं.

“ गुणवंत, मी तुझी ना ? ” माझ्या नेत्रांत भुकेली आर्तता होती. मी अनिमिषपणें पाहात होते.

“ अंतरंग माझं. ” ते म्हणाले.

अन् मीं जास्तच त्यांच्या बाहूंत शिरलें.

* * *

दुष्काळांतून उठलेला प्राणी अन्नाला हापापत नाहीं कां ? तद्वत, हापापलेल्या निसर्गानें अधाशीपणें आपली भूक शमवून घेतली.



## प्रकरण ९ वें

**निशा ?**

मुरारजी पेठ,
सोलापूर.

प्रियमित्र प्रकाश यांसी,

सप्रेम नमस्कार वि. वि.

मागील एका पत्रांत माझी पत्नी वेडी आहे हें मी तुला कळविलें आहेच. आज त्या माझ्या वेड्या पत्नीस माहेरीं पाठवीत आहे. मात्र तिला पुन्हां परत आणणार नाहीं हें निश्चित. तिच्या माहेराकडून मला सालिना पांचशें रुपये मिळकतीची इस्टेट मिळणार होती; परंतु तिच्या चुलत्यानें ती इस्टेट तिच्याच नांवें करून दिली आणि जोंपर्यंत मी तिला नांदवतों आहे, तोंपर्यंत त्या इस्टेटीची मिळकत मी वापरावी असें लेखी करून ठेवलें. अर्थात् तें मला पटणें शक्य नाहीं. वस्तुतः पाहातां मी त्या इस्टेटीकडे भुक्त नजरेनें पाहणेंही शक्य नाहीं. जोंपर्यंत माझ्याठायीं धमक आहे तोंपर्यंत या

पृथ्वीच्या पाठीवर मी अगदीं आनंदांत दिवस काढूं शकेन; मला त्या इस्टेटीची मुळीं गरजच नाहीं. पण लग्नाआधीं जर त्यांनीं वचन दिलं होतं, तर तें आतां पुरं नको कां करायला? पण असे वचनाचे सच्चे आजतरी सांपडणें मुष्कील. त्यांतलाच हा मासला !

बायकोच्या नांवें इस्टेट करून दिली; रीतसर बक्षीसपत्र झालं, कारभार मीं आणि तिचा चुलता या दोघांनीं मिळून पाहावा असं ठरलं. अन् त्याला अनुसरून दोन वर्षेपर्यंत मी त्या इस्टेटीचें उत्पन्न खाल्लेंही ! परंतु पुढें मला स्वतःला तें कमीपणाचें वाटूं लागलें, अन् ‘ माझी बायको वेडी आहे, सबब ही इस्टेट माझ्या नांवें व्हावी ’ अशा तऱ्हेचा अर्ज खरडला अन् कोर्टांत दाखल केला, पण त्याला विरोध तिच्या चुलत्यानें केला आणि कोर्टांत—

“ ही जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत ही इस्टेट हिच्याच नांवें राहाणार, हिच्या पश्चात ही इस्टेट रीतसरपणें आपल्या नांवें होईल. आज आपल्या नांवें ही इस्टेट करून दिली आणि नंतर उद्यां जर पत्नीला नांदवीत नाहीं म्हणालांत, तर तिनें कुणाच्या तोंडाकडे पाहायचें? शिवाय, नंतर पोटगीसाठीं भांडणें करण्याची गरज पडूं नये सबब आतांपासूनच खबरदारी घेतलेली बरी म्हणून ही इस्टेट मी मुद्दाम हिला बक्षीस दिली आहे. तेव्हां जोंपर्यंत ही जिवंत आहे तोंपर्यंत ही इस्टेट तुमच्या नांवें मी करूं देणार नाहीं. मिळकत मात्र तुम्ही दरसाल घ्यावी. मात्र, पत्नीला ज्याक्षणीं नांदवायचें नाहीं या हेतूनें माहेरीं आणून सोडाल, त्या क्षणापासून इस्टेटीवरील मिळकतीचाही हक्क आपला उडून जाईल ” असें सांगितलें. कोर्टानें तें मान्य केलें.

मी त्रासलों, संतापलों अन् त्या भरांत–ती इस्टेटही नको नी ती बायकोही नको, असा विचार करून आज तिला माहेरीं नेऊन सोडून देत आहे. पुढें ती आणि तिचें नशीब ! असो.

गेल्यावर्षीं मी ‘ एस्. टी. सी. ’ च्या परीक्षेला बसलों होतों, परंतु नापास झालों हें तुला माहीतच आहे. यावर्षीं पुन्हां परीक्षेला बसणार आहे. आणि सुदैवानें यावर्षीं पास झालोंच, तर हें सोलापूर सोडून पुण्यालाच राहायला जाणार आहे. दुर्दैवानें नापास झालों तर मात्र पुणें हें मनांतल्या मनांतच राहील अन् सोलापुरीं दिवस कंठणें प्राप्त होईल.

परीक्षेंत पास झालों, तर एकीकडून आनंद वाटेल, तर दुसरीकडून वाईटही वाटेल. परीक्षेंत पास झाल्याबद्दलचा आनंद मनाला क्षणभर फुलकित करील, तर त्यानंतर हा ‘ वाडा ’—नव्हे; वाड्यांतलं ‘ प्रिय माणूस ’ सोडून जावं लागेल ही जाणीव मनाला त्रस्तवील !

मित्रा, ती जर कुमारिका असती तर मात्र खास मनाला हा त्रास झाला नसता. विरोधाचा वणवा जरी चहूं बाजूंनीं पेटला असता, तरी कशाही हिमतीनें मी वणवा तो चुकवून, सारे खांच-खळगे जिवावर उदार होऊन तुडवून पुढें गेलों असतों, त्या कुमारिकेशीं विवाहबद्ध झालों असतों ! पण हाय ! ही विवाहित आहे. कुमारिका नाहीं–‘ सौभाग्यवती ’ आहे ! आणि म्हणून मला कांहींएक करतां येणं शक्य नाहीं.

या साऱ्या स्थितीचं नीट आकलन केलं, कीं–ही प्रचलित असलेली विवाहपद्धति, धर्म, नीति, संस्कृति या साऱ्यांविषयीं उद्वेग नी त्वेष वाटतो मनाला. हल्लींचीं आपल्या समाजांत रूढ असलेलीं हीं नीतिधर्माचीं बंधनं इतकीं जाचक आहेत, कीं तीं मुकाट सुसह्य करण्यापेक्षां, त्यांचा समूळ नायनाट करणेंच सर्वस्वीं हितावह होईल. **प्रचलित विवाहपद्धतींत इष्ट तो बदल तरी झाला पाहिजे,** किंवा ही विवाहपद्धतीच नामशेष झाली पाहिजे. आणि असं होईल तेव्हांच समाजांतली ही बजबजपुरी नाहींशी होईल. अंधारांतले चोरटे खेळ नाहींसे होतील आणि सारा समाज मुक्त-प्रेमाचा उपासक बनून सुखानें अन् स्थैर्यानें कालक्रमूं लागेल. पण जाऊं द्या–जें कधीं घडणार नाहीं त्याचा विचार कशाला ?

सध्यां अगदीं खुशाल आहे. तुझें कसें काय चाललें आहे तें कळविणें. परीक्षेनंतर पत्र येईलच. कळावे. ही विनंति.

तुझाच
**गुणवंत.**

* * *

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

प्रियमित्र गुणवंत यांसी,

सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र मिळालें, मजकूर समजला ! परीक्षेंत पास झाल्यानंतर तुला हर्ष वाटेल तसेंच खिन्नताही वाटेल हें वाचून तर तुझ्या

मनाच्या विचित्र ओढाताणीची पूर्ण जाणीव झाली. पत्राचे शेवटीं 'तुझें कसें काय चाललें आहे तें कळव' असें लिहीलेंस म्हणून तुला आज पत्र पाठवून कळवीत आहे. वस्तुतः तुझें हें पत्र आलें नसतें तरीसुद्धां मी तुला पत्रानें माझ्या वेदना निःसंशय कळविल्या असत्या; पण त्याला यापेक्षां जरा जास्त अवधी लागला असता एवढंच !

निशेशीं—नृत्यांगनेशीं विवाह करून आज मी माझ्या घरालाही पारखा झालों आहें. परवांच मी गांवीं गेलों होतों, पण दोन दिवसांपेक्षां जास्त काळ राहणं अशक्य झालं मला तिथं ! दादा तर माझेवर अतीशय संतापले. नाहीं नाहीं त्या शब्दसमूहानं त्यांनीं मला छेडलं. मुकाट्यानें ऐकून घेणं भाग होतं. त्यांचं रागावणं साहजिकच होतं. मी निघून आलों. निघतेवेळीं आनंदानं निरोप देणारे, आईचे नेहमींचे—कौतुकानें थबथबलेले ते डोळे मला पाहायाला मिळाले नाहींत, कीं कुणीसुद्धां माझी विचारपूस केली नाहीं. तशा त्या दुःखपूर्ण अवस्थेंत मी इकडे आलों, तों इकडे सुद्धां तीच तऱ्हा.

मी फारशा श्रीमंतींतही वाढलों नाहीं, कीं फारशा गरीबींतही वाढलों नाहीं हें तुला माहीत आहे. आज मी स्वकष्टानें इतका समर्थ झालों आहे, कीं पैशानें मिळणारीं सारीं सुखें मी उपभोगूं शकतों. नोकर चाकर, पैसा—सारं कांहीं मुबलक आहे माझ्याजवळ !

पण इतकं असूनही अंतःकरणाला शांति लाभत नाहीं. तगमग तगमग होते आहे सारखी ! ते नोकर नकोत, ते चाकर नकोत, तो पैसा नको—तें कांहीं कांहीं नको असं मला वाटतं आहे. जिच्यासाठीं

मी हा त्याग केला त्या-निशेचा नेहमींचा हंसरा चेहराही नाहींसा झालेला मला दिसून आला. वास्तविक, ती हंसरी असली म्हणजेच मी समाधानांत राहीन असं कांहीं नव्हे, पण जिच्यासाठीं हा असीम त्याग केला, त्या व्यक्तीलाही सुखी करायला आपण सर्वस्वीं असमर्थ आहोंत ही जाणीवच जाचक झाली आहे. आणि या जाचक जाणिवेनेंच माझ्या मनाची शांति नाहींशी केली आहे.

निशेच्या चेहऱ्यावरील हंसरेपणा नाहींसा व्हायला माझ्या मतें एक कारण आहे. माझा अंदाज तसा आहे. तूं माझा मित्र आहेस, तुझ्याजवळ कुठलीही गोष्ट अगदीं निःसंकोचानें सांगायला हरकत नाहीं म्हणून अत्यंत खुलेपणानें पुढील गोष्ट कळवीत आहे.

स्त्रीसुलभ भावनांचा समावेश निशेच्या अंतःकरणांत नाहीं असं केव्हांही होणं शक्य नाहीं. सर्वसाधारण स्त्रीला जें हवं असतं तेंच तिलाही हवं असणं साहजिकच आहे. मुलं हीं स्त्रीला किती प्रिय असतात हें नव्यानं सांगायला नको. मूल होणं म्हणजे स्त्रीला सर्वस्व मिळाल्यासारखं होय! निशा तरी या गोष्टीला अपवाद कशी ठरेल? आपल्याला मूल व्हावं हीच तीव्र जाणीव तिच्या चेहऱ्यावरील हंसरेपणा नाहींसा करायला कारणीभूत झाली असावी असा माझा समज आहे. तिला तसं वाटत असेल तर तें तिच्या दृष्टीनं साहजिकच आहे, पण मला नको वाटतं आहे.

आज समाजांत माझं जें स्थान आहे तें उद्यां माझ्या मुलाला, विशेषतः निशेच्या-माझ्यापासून झालेल्या-मुलाला मिळणें शक्य नाहीं. समाज त्यांच्याकडे हीन नजरेनीं पाहील. समाज त्यांच्याकडे

हीं प्रकाशचीं मुलं म्हणून पाहाणार नाहीं, तर हीं वेश्येचीं मुलं म्हणून पाहील असा माझा दृढ समज आहे. तेव्हां साहजिकच तीं मुलंच न झालेलीं बरीं असं मला वाटणं योग्य नव्हे कां ? आणि तेवढ्यासाठीं मी संततिनियमनाच्या किरकोळ नी साध्यासुध्या साधनांचा हल्लीं उपयोग करीत आहे. अर्थात् असं करतांना मला निशेसमोर माझा मूळ हेतू उघडकीला आणणं अनिष्ट आहे. मी नवमतवादाचं ढोंग पुढें करून नित्य निशेला नव्या थापा मारतों नी माझा इष्ट हेतू साध्य करून घेतों.

ही झाली इकडील हकीकत. मागील एका पत्रांत मी 'माझं शरीर निशेचं आहे आणि मन त्या लेखिकेचं आहे' असं कांहींसं लिहीलं होतं. आणि आतां हें पत्र वाचून तूं कदाचित् असंही विचारशील कीं, केवळ वासनापूर्ति हेंच या विवाहाचं तुझं उद्दिष्ट होतं काय ?

तुझं हें विचारणं खरं आहे, पण तितकंच तें वरवरचं आहे. मी हा विवाह कां केला हें तुला मागें कळविलं आहेच. शिवाय, विवाहबद्ध होऊनही अशी वर्तणूक कां ठेवतों हेंही या पत्रांतून विशद करून सांगितलें आहे. माझ्या वासनांची पूर्तता होत असेल अशी कुणाची समजूत असेल तर ती भ्रामक समजूत आहे. मी माझ्या वासनांची पूर्तता करीत नाहीं तर त्यांचा मी माझ्या स्वहस्तानें होम पेटवीत आहे. माझ्या मनांत दडलेल्या वासना-आशा-आकांक्षा साऱ्या साऱ्या मनांतल्या मनांतच आहेत. मन प्रेमानें भारलेलं अन् भरलेलं आहे, तर शरीर मोहानं भरलेलं आहे.

निशेच्या सान्निध्यांत शरीर आपल्या गरजांची पूर्तता करून घेत आहे, पण मन अतृप्त प्रेमानं तळमळत आहे. याच असमाधानाच्या आहाळेनें माझ्या मनाची शांति नाहींशी झाली आहे. मला त्या लेखिकेच्या सान्निध्याची, सहवासाची, सहजीवनाची भूक लागली आहे. ही भूक शमलेली नाहीं, अतृप्तच राहिलेली आहे. या अतृप्त मनाचे तळमळणारे बोल आंतल्या आंत, आंतल्या आंत विरून– नव्हे, दडी मारून बसले आहेत, माझ्या मनाची शांतता पोखरीत आहेत.

स्वतःच्या हातानं स्वतःचीच चिता पेटविणाऱ्या दधीची ऋषी-प्रमाणंच मीही माझ्याच हातानें सर्वस्वाचा नाश करून घेतला आहे. नोंदणी पद्धतीनेंच विवाह झाला असल्यानं मला घटस्फोट मागतां येणें शक्य आहे. पण मी स्वतः होऊन घटस्फोटाची भाषा काढीनच असं कांहीं नक्की नाहीं. एकदां मी स्वतःच स्वहस्तानें ही आयुष्याची होळी पेटविली आहे, आतां ती पुरती जळून खाक होणंच इष्ट आहे.

यापेक्षां मी जास्तसें काय लिहीणार ?

तुझाच प्रेमाभिलाषी

**प्रकाश**

*   *   *

शशि–निवास,
दादर–मुंबई.

प्रिय ताईस सप्रेम साष्टांग नमस्कार.

मुंबईंत राहायलासुद्धां मला नको वाटूं लागलं आहे. अनायासें भाऊ पुण्याला राहायला जातो आहे. भाऊला पुण्याला नोकरी लागल्याचें मी तुला मागें कळविलें आहे. तेव्हां त्याच्याबरोबर मीही पुण्याला राहायला जाणार आहे. बाबांची नी आईचीही परवानगी मिळाली आहेच. तेव्हां अडचण कसलीच नाहीं. भाऊही आनंदानें तयार झाला आहे हें विशेष आहे. कळावें.

तुझीच
**इंदुमती खरे**

* * *

**निशाचें हृत्कथन.**

प्रकाश, तुमच्याशीं विवाह करून तुमचं जीवन मातीमोल केलं मी ! माझ्याशीं, या पापी–उपभुक्त–स्त्रीशीं तुम्ही विवाह करून आपल्या अंतःकरणाची थोरवी मला पटवून दिलीत, पण तुमचा तो त्याग अन् तुमचं तें अलोट धैर्य; दिपवून टाकलंत मला तुम्हो ! प्रकाश, चुकलांत तुम्ही. नालायक माणसाशीं सोबत धरलीत. हिऱ्याला जवळ बाळगायचं असतं; कोळशाला नाहीं–हें कसं लक्षांत आलं नाहीं तुमच्या ! मीं तुम्हांला सर्वस्वीं अयोग्य आहे. प्रकाश, तुमच्या प्रभावळीला काळीमा येईल इतकी मी पापी आहे, तुमच्या प्रभावळींत राहण्याचा मला अधिकार नाहीं. त्यापेक्षां एका चांगल्या घराण्यांतल्या कुमारिकेशीं कां नाहीं लग्न केलंत ?

लग्न होऊन पुरते तीनही महिने झाले नाहींत तोंच मला पुन्हां पहिल्या नरकांत पाऊल ठेवावं लागलं. एक घोर, अक्षम्य पातक मी करते आहे याची जाणीव आहे माझ्या मनाला. पण मी तरी काय करणार ? सर्वस्वीं नाइलाज होता माझा ! मी कठोर बनले असते—नकार दर्शविला असता तर आईच्या नरडीला तांत लागला असता हें उघड दिसत होतं. डॉक्टरनां एकांतीं विनवलं; त्यांचे पायसुद्धां धरले, पण छे—पाशवी अंतःकरणांत कसली दया नी माया ? साऱ्या सद्गुणांची होळी पेटविली होती त्यांनीं !

* * *

माणसांत येण्यासाठीं केलेले आमचे सारे प्रयत्न फुकट जातात. माणसांत येऊं नये असं आम्हांला वाटतं कां ? त्या रौरवांतच खितपत पडावं अशी कां आमची इच्छा असते ? पण माणसंच आम्हांला माणसांत येऊं देत नाहींत. यांतच आम्ही सदैव लोळत राहावं अशीच यांची इच्छा अन् कृति असते. या खड्ड्यांतून वर यायला वावच ठेवीत नाहींत ते !

* * *

प्रकाशांना आज पत्र पाठवून मी माझा बेत कळविला. पत्रांत मी घटस्फोट मागितला. माझं हें पत्र पाहून प्रकाशांना धक्का बसेल याची खात्री आहे मला; पण त्यांची फसवणूक करून त्यांच्या आयुष्यावर निखारे रचावेत हें पटलें नाहीं मला. पत्रांत फक्त घटस्फोटाचीच मागणी केली. इतर साऱ्या गोष्टी दडवूनच ठेवल्या मी ! त्या दडवून ठेवण्यांत त्यांच्याशीं लबाडी करण्याचा माझा हेतू नव्हता.

* * *

खुनाचा खटला ! कायद्याचें कलम वगैरे कांहीं माहीत नाहीं मला; पण खुनाचा खटला म्हणजे सुरवातीला खालच्या कोर्टांत चौकशी होते म्हणे, तिथें चौकशी होऊन त्या कोर्टानें शेरा मारायचा नी मग तो खटला वरच्या कोर्टांत जातो म्हणे ! वरच्या कोर्टांत जाब जबान्या होऊन, मग निकाल लागतो.

खाललं कोर्ट !!!

आईला या साऱ्या गोष्टीची कल्पना होतीच !

थोडक्यांत अन् स्पष्ट शब्दांत सांगायचं म्हणजे मला आईनें या खालच्या कोर्टाची खुर्ची विशोभित करणाऱ्या बड्या गृहस्थाकडे काल रात्रीं नेलं.

पुरुषांच्या कामुकतेला जोंपर्यंत मर्यादा राहणार नाहीं, तोंपर्यंत आम्हांला माणसांत यायला वाव राहणार नाहीं.

हें असं व्हायला लागलं म्हणून प्रकाशनां पत्र पाठवलं मी ! एकट्या डॉक्टरांच्याच पाशवी शक्तीला मला बळी पडावं लागलं असतं तर कदाचित मला प्रकाशनां पत्र पाठविण्याची बुद्धी झाली नसती. पण ते डॉक्टर, आईच्या बाजूनें खटला चालविणारे ते झब्बू वकील, ते न्यायाधीश—???

"पापी, पापी" म्हणून आम्हांला हिणवणाऱ्यांनीं खरें पापी कोण हें नको कां पाहायला ? आमच्या पापाला खरे जबाबदार कोण ? जे आम्हाला पापाला प्रवृत्त करतात ते ! ज्यांच्यासाठीं आम्हांला पापाला प्रवृत्त व्हावं लागतं ते खरे पापी कां आम्हीं खरे पापी ? खिडकी उघडी ठेवून सामाजाच्या चव्हाट्यावर आम्ही

बसतों म्हणून आम्ही पापी–आणि समाजांत उजळमाथ्यानें वावरणारे, मागल्या दारानें हळूच आंत प्रवेश करून पापाचा पेला घशांत यथेच्छपणें ओतणारे मात्र पुण्यवान ! ही आमच्या समाजाची उलटी न्यायप्रियता !

पंचनामा करायला आलेला तो जमादार, शेटजींच्या पेढीवरचा तो कारकून, आईच्या बाजूनें साक्ष देण्याला तयार झालेला तो साक्षीदार—माझ्यापेक्षांही आईचा 'त्याग' थोर होता; पण तिनें तो '**पेशाच**' पत्करला होता ! "त्याग !" त्याग म्हणा, स्वार्थ म्हणा, पाप म्हणा, कांहींही म्हणा !

डॉक्टर ! वकील ! ! न्यायाधीश ! ! !

या साऱ्यांशिवाय इतरांना आईनें स्वतःचा बळी दिला—? ? ?

*          *          *

प्रकाशांच्याकडून पत्राचं उत्तर आलं, पण हृदयाला भेगा पडल्या तें उत्तर वाचून ! "तुझी इच्छा" एवढे दोनच शब्द लिहून खालीं सही करून पत्र पाठवलं त्यांनीं ! प्रकाश, कसं सांगूं तुम्हांला ? कोणत्या शब्दांनं अंतःकरण खुलं करूं तुमच्यासमोर ? अंतःकरणांत कशी आग आग पेटली आहे; काहिली होते आहे सारखी !

प्रकाश, मी माझ्यासाठीं नाहीं, सुखासाठीं नाहीं, आईसाठीं–आईच्या मुक्ततेसाठीं तुमच्याशीं बेईमान झाले–अभिसारिका बनले.

*          *          *



## प्रकरण १० वें

"मृत्यूची प्रतीक्षा"

शशि–निवास,
दादर–मुंबई.

प्रिय ताईस सप्रेम साष्टांग नमस्कार.

तुझें बरेच दिवसांत पत्र नाहीं, तेणेंकरून फार काळजी वाटते आहे. तरी हें पत्र पाहातांच ताबडतोब पत्र लिहून खुशाली कळवावी. विलंब लावूं नये ही विनंति.

येथल्या एका चित्रकाराबद्दल मी मागील एका पत्रांत कांहींसं लिहिलं होतं. त्या चित्रकाराचं एका निशा नांवाच्या नृत्यांगनेशीं लग्न झालं आहे.

माझ्या साऱ्या आशा विरल्या—पार धुळीला मिळाल्या. हें जीवनसुद्धां नको वाटतं आहे. पण मुद्दाम ओढवून मरणाला आमंत्रण द्यायचं नाहीं म्हणून जगायचं—नव्हे, आले दिवस रेटायचे—त्यांत उत्साह कसचा नी हर्ष कसचा ? सारीच निराशा, सारीच खिन्नता !

पुन्हां एकदां धीर करून चित्रकाराकडे जावं नी त्याला "तुझं प्रेम माझ्यावर आहे का ? मी तुझ्यावर निःसीम प्रेम करते आहे; तूं माझ्याशीं लग्न करशील काय ?" असं विचारावं, असं फार फार वाटतं आहे. पण पुन्हां मनांत असा विचार येतो, छे, तें वेडेपणाचं होईल. माझ्यावर प्रेम असतं तर माझ्याशींच लग्न केलं नसतं कां त्यांनीं ! निदान, तसं शब्दांनीं बोलून तरी दाखविलं असतं. मीच चुकले. त्यांचं माझ्यावर प्रेम असावं अशी स्वतःची भलतीच भ्रामक समजूत करून घेतली अन् आतां निराशेच्या पंकांत रुतून बसलें आहें.

पुरुषांना एकवेळ अविवाहित राहणं शोभून दिसेल, पण स्त्रियांना तें खचित शोभणार नाहीं. लग्नाला आलेल्या कुमारिकेचं वय अतीत झालं, तर काय गहजब होतो हें आपण पाहातोंच आहोंत—मग अविवाहित राहणं कसं शक्य होईल ?

मी लग्न करून घेणार आहे. नव्हे, मला भाग होईल.

आयुष्य घालवायचं आहे. आतां त्यांतलें सारें चैतन्य नाहींसें झालें आहे. हें चैतन्यहीन आयुष्य उगाच असें तसें बेफाट रूढी-विरुद्ध वागून कां घालवा ? कसंतरी घालवायचं आहे; मग लग्न

करून कां घालवूं नये ? जें मिळेल त्यांतच जीव असेतोंपर्यंत समाधानानें राहायचें असें ठरविलें आहे. माझी प्रेममूर्ती दुभंगली. माझं तें दुर्दैव आहे ! मात्र मरतांना मी माझ्या प्रियकराचं—त्या चित्रकाराचं नांव घेऊन मरेन. क्षणभर तरी तेवढं समाधान मला लाभेल. तो क्षण—तो शेवटचा क्षण—तेवढाच क्षण माझ्या मनाला फुलकित—प्रफुल्लित करील.

त्या क्षणाची मी वाट पाहाते आहे.

तुझीच
**इंदुमती खरे.**

* * *



# प्रकरण ११ वें

## अबला–जीवन

**सौ. वत्सला ऊर्फ मीनाक्षी खरे :—**

माझं हें उताला येत असलेलं यौवन; आणि त्यांची ही अशी अलिप्त प्रवृत्ती ! मग स्वास्थ्य तरी कसं लाभायचं ? लग्न होऊन सहा वर्षं झालीं, पण एकदांही माझ्याकडं अभिलाषित अपेक्षेनं पाहिलं नाहीं ! आपली प्रवृत्ती जर ही अशी आहे, तर मग लग्न तरी कां केलं यांनीं ? धड स्वतःलाही सुख नाहीं आणि दुसऱ्यालाही सुख नाहीं.

आमच्या विवाहपद्धतींत ‘ सहज पडे नी दंडवत घडे ’ अशा विवाहांचाच जास्त भरणा. स्थळं पाहातांना आमचे वाडवडील मुलाच्या इस्टेटीची, शिक्षणाची–मसण माती–साऱ्याची चौकशी अगदीं कसून करतील. पण नवऱ्यामुलाच्या प्रकृतिस्वास्थ्याची कधीं चुकूनसुद्धां चौकशी करणार नाहींत. घरादाराला नी इस्टेटीला घेऊन काय जाळायचं आहे ? मूळ गरच नाहीं, मग त्या फणसाचा उपयोग तरी काय ? ज्याच्या जिवावर प्रपंच चालवायचा, कुलाला कुलदीपक निर्माण करायचा, तोच मुळीं–!

लग्नाच्या वेळीं ‘ अव्यंगे पतिते क्लीबे दशदोष विवर्जिते ’ असा मंत्र म्हणतात. मग हें लग्नबंधन झुगारूनच यांनीं माझ्याशीं लग्न केलं ना ?

मला कां भावना नाहींत; कां हें सुख मला नको आहे ? छे; तारुण्यांत उन्माद हा यायचाच ! पावसाळयांत नद्या–ओढ्यांना पूर आला नाहीं असं झालं आहे कां कधीं ? ज्या धर्माची आज्ञा मोडून यांनीं विवाह केला, त्याच धर्माची आज्ञा मोडून हव्या त्या सुखाचा पल्ला मी गांठला तर—? कां गांठूं नये ?

माझं हें उताला येत असलेलं यौवन, त्यांची ही अलिप्त प्रवृत्ती आणि वाड्यांत गुणवंतरावांसारखे तरणे गृहस्थ !

तापत्या दुधावर नियंत्रण ठेवतां नाहीं आलं तर तें उतूं येतं ना ? तश्शी स्थिति झाली आहे माझी सध्यांची !

उताला आलेल्या दुधाची जळती घाण दरवळत नाहीं कां ?

तसंच होणार कां माझं ?–नव्हें, झालं—?

* * *

" जगीं सांगतात प्रीत पतंगाची खरी
झड घालुनि देतो प्राण दीपकाचे वरी. "

दिव्यावर झडप घालून उच्च प्रेमानं भारलेला पतंग प्राणाला मुकतो ना ? तसंच झालं आहे माझं ! प्रेमाची मस्त नशा माझ्या डोळ्यांवर चढली होती. मी स्वतः काय करते आहे याचंसुद्धां भान राहिलं नाहीं. आज मी मेलें आहे. हें वत्सलेचं भूत वावरतं आहे. प्रेमानं भारलेली ही वत्सला आज प्राणाला मुकल्यासारखीच झाली आहे.

प्रेमानें केलेला लपंडाव आतां जगाच्या नजरेसमोर येऊं पाहात आहे. जगाची मला मुळींच भीति नाहीं. जगाला कांहींच माहीत नाहीं. अन् माहीत असलं तरी जोंपर्यंत माझे पती जिवंत आहेत तोंपर्यंत जगाला ब्र काढायला अधिकार नाहीं. भीति आहे ती फक्त त्यांचीच; पतीची ! प्रेमानें घेतलेले आनंदाचे घुटके आतां ओकारीच्या रूपानें पोटाबाहेर पडत आहेत. थोडक्यांत मला दिवस गेले आहेत. आणि तें त्यांना कळलं आहे. त्यासाठींच त्यांनीं मला आतां हांक मारली आहे. मीही त्यांच्या हांकेसरशीं त्यांचेपुढें उभी आहे. भ्याले आहे, पण भ्यायचं नाहीं असं ठरविलं आहे. विचारतील त्या प्रश्नांचीं उत्तरं द्यायचीं असा निश्चय केला आहे.

" तुला बरं वाटत नाहीं कां ? " त्यांनीं अगदीं शांतपणानें मला विचारलं.

" आजच माझ्या प्रकृतीची चौकशी कां करवली तुम्हांला ? " मी उपरोधिक स्वरांत म्हणाले.

" उर्मटपणें उत्तरं देऊं नकोस. सरळ सांग–काय होतं आहे तुला ? " त्यांचा स्वर चढल्यासारखा वाटला.

" मला तरी काय माहीत काय होतं आहे तें ? मला जर माहीत असतं तर मी त्यावर उपाय केला नसता कां ? "

" तुला माहीत नाहीं काय होतंय् तें ? "

माझी भीति आतां थोडीशी चेपली होती. मीही थोडंसं धैर्यानं म्हणाले–" हो, आहे माहीत मला. मला होत असलेल्या वेदना मला कळतात, त्यांची जाणीव माझ्या मनाला आहे, पण त्या निवेदतां येत नाहींत. "

" लाज वाटत नाहीं असं बडबडायला ? " ते.

" नाहीं वाटत. म्हणून तर बडबडते आहे. आणि कां वाटावी लाज मला ? कुणाची वाटावी ? तुमची ? या सहा–सात वर्षांत ज्यांनीं कधीं माझ्या अंगाला हात लावला नाहीं, माझ्याकडे पाहून कधीं स्मित केलं नाहीं–त्या तुमची मी लाज धरूं ? " माझा आवेश वाढत होता.

" एकदम बडबड बंद कर. " उत्तर द्यायला वाव नव्हता म्हणून त्यांनीं बडबडच बंद करण्याचा हुकूम फर्मावला नी रागाच्या भरांत माझ्या मुस्काडींत मारली.

" मारा, आणखी मारा. हा पहा, दुसरा गाल पुढें करतें आहे. खुशाल मारा. तुम्हांकडे पाहून माझ्या गालांवर कधीं गुलाबी रोषनाई विलसली नसेल, ती आज या मारानें तरी निदान विलसूं द्या ! माझे गाल लाल होऊं द्या–मारा–कां थांबलांत ? मारा ना ! इतर

कशांत नाहीं, पण बायकोला मारण्यांत तरी आपला पुरुषार्थ दिसूं द्या." कुंकूतल्या नीरेचा आव आणला मी !

" हद्द झाली आतां तुझ्यापुढं ! धर्माचं उल्लंघन केलंस, परक्याला घराचा उंबरठा दाखवलास—"

" आणि तुम्ही काय कमी केलंत ? मी तुमची धर्माची पत्नी ना ? ती उषा कोण तुमची ? तिला कां मिठ्या मारल्या तुम्ही ? त्यावेळीं तुमचा धर्म कुठें गेला ? धर्मेच, अर्थेच, कामेच अशी शपथ घेतलीत ना लग्नाचे वेळीं ? मग पाळलीत कां ?—" मी प्रत्युत्तर दिलं.

" चूप ! तोंड आवरून बोल."

" नाहीं ! मी बोलणार ! माझ्या तोंडाला येईल तें मी बोलत राहाणार !"

" उलटीं उत्तरं देतेस ?" असं म्हणून त्यांनीं माझ्या मुस्काडींत पुन्हां भडकावली.

" हो, देणार उलटीं उत्तरं मी ! उषेशीं ज्या प्रमाणांत तुमचा संबंध होता, तेवढाच जरी तुम्ही माझ्याशीं संबंध ठेवला असतात, तरी मी स्वतःला धन्य मानून घेतलं असतं—या थरापर्यंत मी वाहवलें नसतें खात्रीनें ! मला हवं असणारं पण तुम्हांपासून न मिळणारं सुख मी शोधून काढलं. आडवाटेनं कां होईना पण गुणवंतरावांनीं मला सुखाचा मार्ग दाखवला." निर्भीडपणानें मी उत्तर देत होते.

" कुठं आहे तो गुणवंत ?" आवेशानें ते म्हणाले अन् गुणवंत-राव राहात होते तिकडे त्यांनीं आपली क्रोधपूर्ण नजर वळवली—पण गुणवंतराव होते कुठं तिथं ? ते आधींच वाडा सोडून परीक्षे-

साठीं परगांवीं गेले होते. " पण या पापाला तूं जबाबदार आहेस, तो गुणवंत नाहीं. " ते म्हणत होते.

" नाहीं. मीही नाहीं अन् गुणवंतरावही नाहींत. तुम्ही–तुम्ही अन् समाज जबाबदार आहे ! तुमच्यांत वैगुण्य नसतं तर हा गोंधळच झाला नसता मुळीं ! आणि समाजानेंही आपल्यासारख्यांसाठीं कांहीं मोकळीक ठेवली असती, तर मी तरी आडवाटेनं सुखाचा पल्ला कां गांठला असता ? " सडेतोड उत्तर होतं माझं !

" शरम वाटत नाहीं बडबडायला ? " अन् त्यांनीं माझ्या कमरेंत लाथ हाणली.

माझा चेव दुणावला. ते माझे पती आहेत हें मी विसरले अन् बडबडूं लागले, " शरम तुम्हांला वाटायला हवी ! सळसळत्या भावना स्वस्थ राहूं देत नाहींत–अन् समाजाला सांगायचं धैर्य होत नाहीं, अशा दुहेरी पकडींत सांपडलेल्या माझ्या हांतून नीतिनिर्बंधांना उल्लंघून हें कृत्य घडून आलं म्हणून मला दोष कां देताहांत ? "

" दोष कां देताहांत ? पण हें घडून यावं तरी कां ? एवढाही संयम नाहीं ? "

" संयम ? संयमाची भाषा तुम्ही कशाला वापरतां ? आमच्या सान्निध्याला सततपणा लाभला, आमच्या यौवनसुलभ लालसेनें एकमेकांकडे ओढ घेतली आणि अखेरीस नीतिनिर्बंधांचं उल्लंघन झालं–निसर्गप्राप्त घडून आलेल्या गोष्टी आंहेत या ! यांत त्रागा करण्याचं कारणच काय ? स्त्री आणि पुरुष यांच्यांत आकर्षकता

निर्माण व्हायचीच; जोंपर्यंत स्त्रींत स्त्रीत्व आहे आणि पुरुषांत पुरुषत्व आहे, तोंपर्यंत त्यांच्या वासना प्रदीप्तच राहाणार, आणि वासनापूर्तीसाठीं त्यांचे अहर्निश प्रयत्नही चालू राहाणारच." मी म्हणत होते, पण त्यांनीं मला पुरतं बोलूं दिलं नाहीं. त्यांनीं माझ्या कमरेंत पुन्हां एक लाथ हाणली. त्या वेदनेनं माझा जीव कासावीस झाला, मला रडूं येऊं लागलं, पण त्या तशा स्थितींतही मला मैथिलीशरण गुप्ताचे ते चरण आठवले—

"अबला जीवन हाय तुम्हारी यही कहानी
आंचळमें दूध और आंखोंमें पानी."

* * *



## प्रकरण १२ वें

**मेव्हणे ? कीं—**

“ मृदु प्रेमाळा गीत यशाचें गातें—
पाळणा तुझा हलवीतें ॥ ध्रु० ॥

मम सौख्याच्या फुलल्या साऱ्या वेली
सुमनांच्या ओझ्याखालीं ॥

ही प्रणयाची गुलाबकळि अजि फुलली
दरवळली मोदें भरली ॥

प्रेमाला वाचा फुटली
संभवांत रूपा आली
भाग्यवती मज ठरवीली

मी विनयवती झोका तुजला देते
पाळणा तुझा हलवीते ॥ १ ॥

जन्मती जगीं कितिक अर्भकें बाळा
परि त्यांची खंति कुणाला ?

येऊन जगीं जगा जागृती द्यावी
कीर्तीची तोफ झडावी

प्रभु रामाचा पाठ सदा गिरवावा
सन्मार्ग जगा दावावा

सत्यप्रिय व्हावें थोर
कुल उद्धरुनी महशूर
इंग्रजा करी जर्जर

ही सफळ सख्या होवो आशा बाळा
निज नीज सख्या वेल्हाळा ॥ २ ॥"

माझ्या बहिणीनें–इंदूनें–मुद्दाम हें गीत माझ्याकडे पाठवून दिलं. गीतांत वर्णन केल्याप्रमाणें मला पुत्र व्हावा अशी तिची इच्छा;– पण–पण—?

तिनें पाठविलेलं हें गीत आज मी वेड्यासारखी म्हणते आहे नी अश्रु ढाळते आहे.

कलंकिता !

खरंच, मी कलंकिता आहे कां ? काय कलंक लागला माझ्या आयुष्याला ? मनानें वरलेल्या पतीशीं संबंध ठेवला मी ! मनानें वरलेल्या पतीशीं–हो, गुणवंतरावच माझे पती ! गुणवंतरावांना मी पती म्हणून कां संबोधूं नये ? संपत्तीचें भरपूर उत्पादन आणि

संततीची उत्तम जोपासना हेंच गृहस्थाश्रमांतील व्यक्तीचें आद्य कर्तव्य ना ? मग, यांनीं हें गृहस्थाश्रमींचं कर्तव्य पाळलं आहे कां ? मग त्यांना मी पतीच्या नात्यानें कां संबोधूं ? छे, ते माझे पती नव्हेत. गुणवंतरावच माझे पती. कायद्याच्या आणि धर्माच्या दृष्टीनें मी हा अक्षम्य गुन्हा करीत असेन, पण माझ्या मनाच्या दृष्टीनें मी मुळींच गुन्हेगार नाहीं. आणि जोंपर्यंत माझं मन याबद्दल ग्वाही देतं आहे तोंपर्यंत मी शुद्ध आणि निर्मळच आहे. माझ्या हातून जर चूकच झाली नाहीं, तर रुखरुख तरी कां वाटावी माझ्या मनाला ? आणि कशाबद्दल वाटावी ?

'मला वेड लागलं आहे; मधून मधून वेडाचे झटके येतात' असं घरांतलीं माणसं म्हणतात. होय, खरं आहे तें त्यांचं म्हणणं ! खरोखरीच मला वेड लागलं आहे. मला माझ्या मृत बाळाचं वेड लागलं आहे.

'आई !'—आई व्हावंसं वाटलं, कांट्या—कुट्याच्या मार्गावरून गेले. आई झाल्यें. पण, 'आई'पण लाभलं आहे कां माझ्या आयुष्याला ? मूल झालं, पण जगाकडे पाहाण्यासाठीं माझ्या मुलानें पुरते डोळे उघडले नाहींत तोंच त्याला या अन्यायी जगाचा तिटकारा आला म्हणूनच, कीं काय त्यानें अर्धवट उघडलेले आपले डोळे कायमचे मिटले. त्यानें आपली इहलोकांतली यात्रा इहलोकांत पाऊल टाकतांक्षणींच आटोपली ! बाळा, तुला या अन्यायी जगांत राहायला नको का रे वाटलं ? तुझ्यासाठीं यातना सहन केल्या, कुणाची पर्वासुद्धां केली नाहीं, आणि अखेरीला मला टाकून



मेल्हणे ? कीं—

गेलास ! तुझ्या वियोगानं माझं अंतःकरण जळायला लागलं आहे. गोठ्यांत वासरूं हंबरूं लागलं, कीं बाळा, तुझ्या रडण्याचा आवाज ऐकते आहे असा सारखा भास होतो अन् पान्हावली जाते मी ! आवरतच नाहीं त्याला काय करूं ? दुधाच्या धारा ओहोळूं लागल्या, कीं त्याच्या क्षणमात्र उष्णस्पर्शानं अंग थरारून जातं, मन धुंद होतं, आणि जीव शरमिंदा झाला, तरी तुझ्या स्मृतीनं व्याकळून जातो. तूं तर गेलासच ! आयुष्याचा हा असा वणवा पेटलेला; तुझ्यासाठीं जीव जगवला, आतां कुणासाठीं जीव जगवूं ? माझं म्हणून असं कांहीं आहे का आतां या जगांत ?

* * *

इंदूच्या लग्नाची लग्नपत्रिका घरीं आली होती. मला मात्र वाचायला मिळाली नाहीं. त्यांनीं ती दाखवली नाहींच मला. इंदूनें एक अगदीं खासगी पत्र पाठवून आपलं लग्न जमल्याचं सांगितलं होतं. परंतु त्याचवेळीं माझा प्रसूतिकाळ जवळ, अगदीं नजीक येऊन ठेपल्यानें मला तिच्या लग्नाला जातां आलें नाहीं. आणि घरचं लग्नाला कुणींच गेलं नाहीं.

आतां चांगला महिना लोटला होता. पुन्हां पूर्ववत् सर्व कांहीं सुरळीत चाललं होतं. म्हणून मी माहेरीं जाण्याची गोष्ट काढली. मोठ्या मुष्कीलीनें परवानगी मिळाली.

मला माहेरीं येऊन पांच सहा दिवस झाले नाहींत, तोंच इंदूला सासरीं पाठविण्याची तयारी चालली. तिच्या पतीचें पत्र आलें होतें म्हणे ! आम्ही दोघींनींहि एकमेकांजवळ आपलं अंतःकरण खुलं

केलं असल्यानें, आमच्या प्रेमांत एकप्रकारची स्निग्धता आली होती. तेव्हां अशावेळीं फार दिवसांनीं भेटलेल्या आपल्या प्रेमळ बहिणीचा —इंदूचा—इतक्या लौकर पुन्हां वियोग होणार हें पाहून मला वाईट वाटलं. इंदूलाही वाईट वाटलं. पण लागलीच ती म्हणाली,

"पाठराखण म्हणून चलतेस कां ? बरं होईल पहा आलीस तर—! माझ्याही जिवाला विरंगुळा वाटेल तुझ्या सहवासांत आणि तुलाही आपल्या दुःखाचा विसर पडेल जरासा !"

नाहीं म्हणवेना मला, नी अखेरीस मी तयार झालें.

इंदूच्या सासरीं जायला मी, भाऊ नी इंदू निघालों. भाऊ आम्हांला पोहोंचवून लागलाच परत निघणार होता.

स्टेशनवर आम्हांला उतरवून घ्यायला इंदूच्या पतीचा स्नेही आला होता. त्या स्नेह्याची आणि इंदूची बरीच ओळख असलेली दिसून आली.

*   *   *

भाऊ सरळ माडीवर गेला. आम्ही मात्र आंतल्या खोलींत गेलों. प्रवासांतले कपडे उतरण्याच्या मी तयारीला लागले होते. इंदू स्वयंपाकघरांत चहा करण्यांत गुंतली होती. घरांत पतीशिवाय दुसरं कोणीच माणूस नाहीं हें तिनें मला आधींच प्रवासांत सांगितलं होतं. तिला नांव घ्यायचा आग्रह केला होता मी, नी जेव्हां तिनं उखाण्यांतून नांव घेतलं, तेव्हां तें ऐकून मी गांगरून गेलें होतें. पण पुन्हां मी कसंबसं मनाचं समाधान करून घेतलं होतं. मी पातळ बदलीत होतें, इतक्यांत मला ओळखीचा आवाज ऐकूं आला. आतां



मेव्हणे ? कीं—

मात्र माझी पूर्ण खात्री झाली. मी भांबावून गेलें. अन् दरवाजांतून हळूच डोकावून बाहेर पाहिलं.

माडीच्या जिन्यावरून भाऊसमवेत गुणवंतराव खालीं उतरत होते.—

गुणवंतराव—???

माझं काळीज थरथरत होतं. जीभ कोरडी पडली. डोळ्यांना अंधारी आली. पायांत त्राण उरला नाहीं. मी मटकन खालीं बसलें. —नंतर मला वाटतं मी बेशुद्धच पडलें.

* * *

रात्रीं नऊचा सुमार असेल, इंदू माझ्याजवळ साबूदाण्याच्या लापशीचें भांडें घेऊन बसली होती. मी इकडे तिकडे पाहिलं, कुणीच नव्हतं घरांत.

“ताई, काय झालं तुला असं एकाएकीं ?” इंदू मला विचारीत होती.

मला काय झालं ? मी अशी एकाएकीं कां बेशुद्ध झालें ? कसं सांगणार मी तिला ? माझ्या अंतःकरणाला होत असलेल्या वेदना— आणि त्यांचं कारण जर तिला कळलं, तर—? माझे एके काळचे... तेच आजचे माझे मेव्हणे हें तिला कळलं तर...?

मी न बोलतांच डोळे मिटून घेतले.



## प्रकरण १३ वें

### गुणवंत ?

प्रकाश आर्ट स्टुडिओ,
मुंबई नं. २.

प्रिय मित्र गुणवंत यांसी
सप्रेम नमस्कार.

मी माझ्या आयुष्याची स्वतःच्या हातानें होळी पेटविली आहे, असं मी तुला मागील पत्रांत लिहिलं होतं. ती होळी पुरती जळून खाक होऊं नये अशीच विधीची घटना असावी.

निशेचं पत्र आलं आहे. त्यांत तिनं घटस्फोट मागितला आहे. मीही तिला उत्तर पाठविलं आहे. त्यांत फक्त मी दोनच अक्षरं लिहिलीं आहेत.

गुणवंता, मी हा विवाहच केला नसता तर फार बरं झालं असतं, असं आतां वाटायला लागलं आहे.

या विवाहामुळें मी घरादाराला पारखा झालों. आणि आतां निशेलाही पारखा होत आहे. एकूण काय—???

निशेचा सहवास मला सर्वस्वीं सुखावह होतो आहे असा मात्र याचा अर्थ नव्हे. पण आतां ही फारकत माझ्या मनाला जितकी सुखावह वाटेल तितकीच ती दुःसह होईल.

आधींच माझ्याकडे उपहासानं आणि तिरस्कारानं पाहाणाऱ्या जगाला आतां जास्तच फावेल. पूर्वींपेक्षांही आतां त्यांच्या नजरेंतला कुत्सितपणा वाढेल. जें करूं नये तें केलं हें खरं; पण तेंही आतां शेवटाला नेतां आलं नाहीं ही असमर्थता किती दुःसह आहे याची यथार्थ कल्पना नुसत्या शाब्दिक वर्णनानं कशी येणार ?

माझ्या मनाची ही व्यग्रता इतकी वाढली आहे, कीं मी घरींच तास न् तास बसून असतों. शून्य दृष्टीनं नजर जाईल तिकडे पाहातों आहे. अलिकडे स्टुडिओंतही फारसा जात नाहीं मी !

मला इथं अगदीं करमेनासं झालं आहे. कुठें तरी निवांत स्थळीं स्वस्थ कांहीं दिवस घालवून शरिराची अन् मनाची अस्वस्थता घालवावी अन् बेचैनी नाहींशी करावी—असं फार फार वाटायला लागलं आहे.

मी आज रात्रींच्या गाडीनं माथेरानला जाण्याच्या तयारींत आहे. आतां माझं पुढील पत्र माथेरानहून येईल. कळावें.

तुझाच प्रेमांकित

**प्रकाश.**

*  *  *

मीना भुवन
टिळक रोड, पुणें.

प्रियमित्र प्रकाश यांसी,
सप्रेम नमस्कार.

तुला पत्र पाठवून मुद्दाम आमंत्रण दिलें असूनही तूं माझ्या लग्नाला आला नाहींस याबद्दल फार वाईट वाटलें. असो. आतां तूं माथेरानला येणार आहेस, तेव्हां इकडेही तसाच एक फेरी टाकशील तर तुला माझा 'नवा संसार' पाहायला मिळेल अन् परीक्षेंत पास झाल्याबद्दलची व लग्नाबद्दलचीही फीस्ट मिळेल.

ज्या जाळ्याच्या पाशांतून मुक्त होण्यासाठीं मी हें लग्न केलं, त्या जाळ्याचा पाश तर तुटला नाहींच, पण उलट तो पाश नकळतपणें योगायोगानें इतका जखडला गेला आहे, कीं आतां त्यांतून मुक्त होण्याचाही मार्ग उरलेला नाहीं. नव्हे, सारे प्रयत्नच खुंटले आहेत आतां.

मी सोलापुरीं ज्या वाड्यांत राहात होतों, त्या वाड्याचे मालक श्री. पुरुषोत्तमराव हे तेथल्याच एका शाळेंत हेडमास्तर आहेत हें मी तुला मागेंच एका पत्रांतून कळविलं होतं. त्यांच्याकडे उषा नांवाची एक मुलगी शिकवणीला येत होती. हल्लीं ही उषा इथं आली आहे. तिची माझी सोलापूरची ओळख; आणि योगायोगाची गोष्ट अशी, कीं हल्लीं तीसुद्धां मी राहातों आहे त्याच्या शेजारच्याच वाड्यांत राहाते आहे. तिच्या ओळखीची एक मुंबईची मुलगी निघाली आणि सारा व्यवहार परस्पर होऊन हें माझं लग्न

झालं. फक्त लग्नापूर्वी मी ‘ डोळ्यांखालून ’ घातलेली बरी या हेतूनें वधूपरीक्षेच्या निमित्तानें तिला एकदां पाहिलं एवढंच ! माझी ही पत्नी रूपानें बरी आहे. सुविद्य आहे, सुशिक्षित आहे आणि बरीच पुरोगामी मताची आहे. पण—???

सोलापूरच्या वाड्यांतील मालकिणीसंबंधाची हकीकत मी तुला कळविली होतीच. योगायोगाची गोष्ट अशी, कीं माझी ही पत्नी त्या सोलापूरच्या वाड्याच्या मालकिणीची बहीण आहे.

म्हणजे, जें नको म्हणून मी सोलापुर सोडलं, अन् हें दुसरं लग्न केलं, तेंच नेमकं पुन्हां माझ्यासमोर आलं आहे. आणि आतां तें इतक्या भरभक्कम स्वरूपांत माझ्यासमोर उभं आहे, कीं—??

मित्रा प्रकाशा, आज आणखी थोडंसं खुलेपणानं हा अंतर्यामां-तला पडदा बाजूला सारतों.

सोलापूरच्या वाड्याच्या मालकिणीवर माझं प्रेम बसलं होतं हें मी तुला कळविलं होतंच. तिचंही माझ्यावर प्रेम बसलं होतं. एकाच वाड्यांत आम्हां दोघांचं वास्तव्य ! सान्निध्याची वृद्धि–यौवनाची उन्मत्तता, न उपभोगलेल्या सुखाची तळमळ आणि हव्यास मग–मग—!!!

सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. माडखोलकर यांनीं कुठेंसं म्हटलं आहे, कीं ‘ जगांत जेवढीं सुशील म्हणून गणलीं जातात, त्या माणसांच्या भोंवतीं केवळ त्यांचं शील बिघडण्यासारखी परिस्थिति नसते म्हणून सुशील राहिलेलीं असतात. ’ माझ्या स्वतःच्या अनुभवारून तरी त्यांचें हे उद्गार खरे ठरले आहेत.

लग्नापूर्वीं मला या गोष्टीची कांहींच कल्पना नव्हती. माझ्या ध्यानींमनींही तें नव्हतं. आज माझ्या लग्नाला भरपूर एक महिना होऊन गेला आहे. माझी पत्नी इतके दिवस माहेरींच होती, दोन तीन दिवसांपूर्वी ती आली. बरोबर तिचा भाऊ अन् ती मालकीण–सुशिलाबाई–असे दोघे होते.

तिचा भाऊ परत गेला आहे. आणि ती मात्र इथं राहिली आहे.

पुन्हां आमच्या सान्निध्याला सततपणा येऊं पाहात आहे, पण आतां माझं दुसरं लग्न झालं आहे. तेव्हां नाइलाजानें मला माझं मन मारणं भाग आहे.

माझी ही दुसरी पत्नी तुझ्या ओळखीची आहे. तूं इकडे ये म्हणजे तुला तिची ओळख पटेल.

लग्नापूर्वीं मी तिला एकदांच पाहिलं आहे असं मी म्हटलं आहे खरं, पण तिची माझी 'तशी' ओळख फारां दिवसांपूर्वींपासूनची आहे. तिचं शरीरसौंदर्य लग्नापूर्वीं मला फक्त एकदांच अवलोकायला मिळालं, पण गुणसौंदर्य मात्र वर्षापूर्वींच मला पाहायला मिळालं आहे. आणि तेव्हांपासूनच मी तिला–म्हणजे तिच्या मानसिक सौंदर्याला–ओळखतों आहें.

माझ्या पत्नीची बहीण-म्हणजे सोलापूरच्या वाड्यांतली मालकीण –आमच्या लग्नाला आली नव्हती. लग्नाला येणं शक्य होण्यासारखं नव्हतंच ! कारण त्यावेळीं तिचा प्रसूतिकाल जवळ ठेपला होता.

आतां ती पाठराखण म्हणून बहीणीबरोबर आली आहे. पण एकटीच आहे. मूल वगैरे कांहीं नाहीं. बहुतेक तें मेलं असावं.

मात्र तें मूल केव्हां अन् कसं मेलं असावं हें मला अद्यापी कळलं नाहीं.

लग्नापूर्वींच जर मला या गोष्टी कळल्या असत्या तर मी खास या लग्नाला तयार झालों नसतों. पण आतां काय; झालं गेलं—होऊन गेलं. आतां विचार करण्यांत अन् मेंदूला शीण देण्यांत काय अर्थ ?

पहिलं लग्न केवळ सक्तीनं झालं होतं. आतांचं हें लग्न तर स्वेच्छेनं झालं आहे. पहिल्या लग्नानंतर झालेली कृती एक वेळ क्षम्य समजतां येईल, पण आतां जर पूर्वींसारखं कांहीं झालं, तर तें अक्षम्य होईल.

आपण पहिला त्रास चुकविण्यासाठीं दुसऱ्या एकाद्या मार्गानं स्वेच्छेनं जावं, जातां जातां पुन्हां पहिला मार्ग आडवा यावा आणि ते दोन्ही मार्ग एकत्र यावेत म्हणजे पहिल्याच्या जाचकतेनं विटलेलं मन त्याच्याच सेवनाला पुन्हां तयार व्हावं—किती विचित्र अन् दुःसह होतो तो योगायोग ! असाच कांहींसा योगायोग माझ्या आयुष्यांत घडला आहे. विवाहित स्त्री माझी प्रेयसी ! ती विवाहित आहे, तेव्हां आपल्या प्रीतीचं मधुर अमृत आपल्याला अखंड प्राशनास मिळणें दुर्लभ याची तीव्र जाणीव झाल्यामुळें गांव सोडून इकडे निघून आलों. पहिली स्मृति जिवाला जाचूं लागली म्हणून ती अस्वस्थता घालविण्यासाठीं, केवळ जिवाला विरंगुळा वाटावा म्हणून मी हें दुसरं लग्न केलं, पण ज्या प्रेयसीच्या प्रीतीचें अमृत दुर्लभ म्हणून सोडून दिलं, त्याच प्रेयसीची ही भगिनी आणि तिची पाठराखण करण्यासाठीं आलेली ती माझी प्रेयसी—त्या वेळेचं तें

प्रीतीचं मधूर अमृत—आज मला कडू काल्यांसारखं बेचव अन् कडवट वाटूं लागलं आहे. छे छे ! तसं नव्हे, तर तें मधुर अमृत आज मला चाखतां येत नाहीं. कोल्ह्याला उंचावरचीं द्राक्षें मिळालीं नाहींत म्हणून त्यानें तीं आंबटच आहेत असं म्हटलं नाहीं कां ? तसंच आहे हें माझं वरील विधान !

माझ्या या पत्नीला आमच्या या गोष्टी कळल्या नाहींत अशी माझी खात्री आहे; आणि त्या न कळाव्यात अशी माझी इच्छा आहे. म्हणजे माझा हेतु लबाडी अन् लपवाछपवी करण्याचा आहे असं खचित नव्हे. पण जर तें तिला कळलं, तर तिच्याच मनावर या गोष्टीचा विपरीत परिणाम होईल, अन् मग पुन्हां आमच्या संसाराला ओहोटी लागेल. आत्तां कुठें भरती येऊं लागली आहे, तोंच पुन्हां ओहोटी ! संसाराला लागणाऱ्या ओहोटीचं अन् स्वतःच्या मनाला होणाऱ्या दुःखाचं मला कांहीं वाटत नाहीं, पण माझ्या या नव्या पत्नीचं मनःस्वास्थ्य बिघडूं नये, तिला वाईट वाटूं नये एवढीच माझी इच्छा आहे. असो. फारच लांबलं नाहीं हें पत्र ! आतां पुरें करतों. पत्राचें उत्तर देण्यापेक्षां स्वतःच येशील तर फार बरं होईल. कळावें.

तुझाच
**गुणवंत.**

*  *  *



## प्रकरण १४ वें

### भूवरील नरक.

**निशाचें हृत्कथन :—**

पुढल्या आठवड्यांत आईवरील खटल्याचा निकाल होणार आहे. आई या खटल्यांतून दोषमुक्त होईल असं कांहीं दिसत नाहीं.

आईनें स्वतःच्या शरिराची होळी करून घेतली. पैशापरी पैसा उधळला, माझाही पुरुषांच्या पाशवी कामुकतेला बळी दिला, आणि अखेरीस जें येऊं नये कपाळीं अशी इच्छा होती, तेंच येणारसा रंग दिसूं लागला.

*          *          *

आई, सुटकेसाठीं किती उपाय केले आपण ! आणि अखेरीस काय अवस्था येणार कपाळीं !

प्रकाश, तुमच्याशीं लग्न केलं मी ! आम्हां गोमंतकीय ज्ञातींत आधींच लग्नाची चाल नाहीं. पण पुरोगामी मताचा फांस माझ्या काळजाला भिडला होता. 'आमचा जन्म कांहीं नरकांतच लोळण्यांत झाला नाहीं.' अशा आढ्यतेनं मी म्हणत होतें अन् वागतही होतें.

माझं पहिलं जाहीर नृत्य झालं त्यावेळच्या रात्रीचा प्रसंग—मी पहिल्यानं आईच्या सम्मतीनं मद्य घेतलं त्यावेळच्या रात्रीचा प्रसंग; त्यानंतर माझं सौंदर्य लुप्तप्राय होऊं नये म्हणून आईनें डॉक्टरांच्या सल्ल्यानें माझ्या पोटाचें केलेलें ऑपरेशन आणि लागलीच, त्यानंतर दीडच महिन्यानें त्याच डॉक्टरांनीं पशुवृत्तीनें माझा घेतलेला आस्वाद, पुढें निरनिराळ्या कारणांनीं आलेल्या पोलिस अधिकाऱ्यांच्या पाहुणचारासाठीं मला द्यावा लागलेला माझ्या स्वतःच्या सौंदर्याचा चहाचा पेला, त्या पेल्यांतल्या उष्णतेनं स्वतःच्या सत् आकांक्षांना मला द्यावी लागणारी मूठमाती—प्रकाश, वीट आला होता मला त्या साऱ्या कृत्यांचा. पुरुषांच्या पाशवी कामुकतेचा इतका तिटकारा आला मला त्यावेळीं, कीं पुरुषांच्या वाऱ्यालाही उभं राहायला नको वाटायला लागलं मला. आणि अखेरीस त्या तिटकाऱ्यापोटींच एक पुरुषनिष्ठतेच्या भावनांचा—पुरोगामी विचारसरणींचा—जन्म झाला. आमच्या जातीचा माझ्यावर स्वतःच्या करणीनें अतीशय रोष झाला तरी बेहत्तर अशा हिरहिरीनें मी या नरकांतून पाऊल बाहेर काढण्याच्या खटपटींला लागलें. त्या दिवसापासून—निश्चयाच्या त्या क्षणापासून मी नृत्यसुद्धां करायचं नाहीं असं ठरविलं. माझं वागणं आंईला पसंत नव्हतं. तिनें आपली नापसंती कितीदां तरी माझ्या-

जवळ बोलून व्यक्तिविली होती. पण मी—? मी बेभान झाले होते. मला एकच माहीत होतं, कीं या नरकांतून बाहेर पडायचं, पशूंतून माणसांत यायचं. आणि—एकपुरुषनिष्ठ राहायचं—आर्यस्त्रीप्रमाणें जीवन व्यतीत करायचं.

पण प्रकाश, साऱ्याच कांहीं महानंदा अवतरत नाहींत हेंच माझ्या प्रत्ययास आलं अखेरीस.

आईच्या जिवावर विसंबून राहायचं—आईच्या कमाईवर माझा देह जगवायचा या परावलंबनाचाही मला तिटकारा वाटूं लागला. ज्या नरकांतून मला बाहेर यायचं होतं, त्या नरकांतल्याच अंग-विक्षेपावर अन् विक्रीवर मिळविलेल्या अन्नाचा कणही नको असा निश्चय करून बाहेर पडले.

पण जाणार कुठं ?—

स्वकष्टावर जगायचं असा निश्चय करून मी बाहेर पडलें होतें. शिक्षण थोडसं झालं होतं. वाटलं त्याच्या जोरावर कुठें तरी नोकरी मिळेल.

शाळा ! शाळेंतलं वातावरण डोळ्यांपुढें नाचूं लागलं. वाटलं शाळेंत नोकरी करावी. शिक्षकीण व्हावं नी पुढें माझ्या विचार-सरणीचा कोणी ग्राहक भेटला तर त्याच्या सान्निध्यांत सुखानं अन् प्रामाणिकपणानं राहावं. पण संकल्प आणि सिद्धी हीं कधीं एक ठिकाणीं न मिळणारीं दोन टोकं आहेत. दोन समांतर रेषा कधींही एकमेकांना मिळत नाहींत, अनंतांतच त्यांची मिळणी व्हायची. संकल्प आणि सिद्धी यासुद्धां अशाच दोन समांतर

रेषा असाव्यात. त्यांची पूर्तता होणें बहुधा शक्य नसतें. निदान माझ्या अनुभवास तरी ही गोष्ट आली आहे.

'दृष्टी तशी सृष्टी' म्हणतात. मला या म्हणीचा नीटसा अर्थ कळलेला नाहीं. पण एवढं मात्र वाटलं त्यावेळीं, कीं माझ्यासारखंच जगही असेल ! मला माणसांत यायचं होतं. जगही मला आनंदानें जागा रिकामी करून देईल. पण नाहीं. जगाची दृष्टी निराळी आहे याची मला पुरेपूर जाणीव झाली.

आधींच त्यांच्या नांवाचा झब्बूपणा माझ्या कानांवर आला होता. पण समाजांतलं त्यांचं स्थान उच्च होतं, 'रावबहादूर' या पदवीनं त्यांचं समाजांतलं स्थान जास्तच विभूषित झालं होतं. पण तेच रावबहादूर दुःशील असतील असं मात्र मला खचित वाटलं नव्हतं. शाळेंतल्या रिकाम्या जागेवर नेमणूक व्हावी म्हणून मी अर्ज घेऊन रावबहादुरांना भेटायला गेलें—?

निराश अन् उद्विग्न मनानें मी परत आलें.

*  *  *

चांगल्या ठिकाणींच बजबजपुरी माजलेली दिसली तिथं माझ्या-सारख्या वाइटांतून चांगल्या ठिकाणीं येऊं पाहाणाऱ्या व्यक्तीची कशी तड लागणार ?

*  *  *

मी तो नाद सोडला अन् शेवटीं एका चित्रकाराकडे नोकरीस राहिलें. बिचारा सज्जन होता, पण दुर्दैव माझं—तो परदेशांत उच्च शिक्षणसंपादनासाठीं गेला आणि नंतर मी तुम्हांकडे नोकरीला

राहिलें–तुमचं सौजन्य माझ्या प्रत्ययाला बरेच दिवस आलं. आणि पुढें–पुढें त्या प्रसंगानंतर मला वाटलं–‘ छे, हेंही नाणं हिणकसच निघणार–बद्द वाजणार ’–पण माझा तो भ्रम होता. दुसऱ्या दिवशीं आलेलं पत्र वाचलं अन् वाटलं, कीं आतां माझ्या हृदयांतल्या संत् आकांक्षांना मूर्त स्वरूप येणार ! मी आईच्या हरकतीची पर्वा केली नाहीं. कुणाच्याही शब्दाची मातब्बरी केली नाहीं–उड्या मारीत आनंदानें धांवत आलें, आणि प्रकाश, तुमच्या गळ्यांत लग्नाची माळ घातली.

आमच्या शेजारच्या साऱ्याजणीं चकित झाल्या. कोणी उपहासानें हंसल्या. एकीनें तर स्पष्टपणानें बोलून दाखविलं–‘ कसलं लग्न नी काय ? अग वळणाचं पाणी वळणांनच वाहायचं. आज महानंदा झालीस पण उद्यां–जाऊं द्या झालं ! बोला कशाला ? आपली कडूकारळ्यांची जात–कडू ती कडूच राहायची—”

प्रकाश, मला पटले नाहींत त्यावेळचे तिचे हे उद्गार ! पण आज मात्र मला त्या उद्गारांतली सत्यता पटली, अगदीं पुरेपूर पटली.

कडू कारळें ! तुपांत तळा नाहींतर साखरेंत घोळा ! कडू तीं कडूच राहाणार ! आमचा जन्मही कडू कारळ्यांसारखाच—

नव्हे, समाजच कडू कारळ्यासारखा आहे. समाजाची पशू अन् पाशवी वृत्ती ही कडू कारळ्यासारखी आहे. ती कधींही आणि कसल्याही उपायानें गोड व्हायची नाहीं. निदान मला तसं वाटतं. जोंपर्यंत समाजांतला हा कडूपणा नाहींसा होणार नाहीं, तोंपर्यंत आमच्यासारख्यांच्याही जीवनांतला कडूपणा नाहींसा होणार नाहीं.

* * *

" माती असशी, मातित मिळशी—"

हा चरण मी लहानपणापासून ऐकते आहे. खरा आहे तो चरण! आम्ही नरकांत जन्मलेले—आमचा जन्म नरकांत झालेला—नरकांतच खितपत पडणार आम्ही. वर येण्यासाठीं आम्ही धडपडावं तों वरच्यांनीं आम्हांला रेटून द्यावं, ढकलून द्यावं, वर घेऊं नये. अशीच कृति चालते आहे वरच्यांची. चाललों घसरत—आणि शेवटीं नरकांतच पडणार.

नरकांत! नरकांत!! नरकांत!!!



माथेरान,

प्रियमित्र गुणवंत यांसी सप्रेम नमस्कार.

निशाशीं फारकत करून घेऊन आज दुपारीं मी येथें आलों आहे.

निशानें घटस्फोट मागितला म्हणूनच केवळ मी हा विवाह तोडला असं खचित नव्हे, तर त्याला आणखीही कांहीं नाजूक पण कुजकीं कारणं झालीं आहेत.

पत्रांतून या साऱ्या गोष्टींचा जास्त खुलासा करतां येणं शक्य नाहीं. फक्त एकच वाक्य लिहितों—निशा अखेर आपल्या जातीवर गेली.—एवढ्यावरून ओळख काय ओळखायचं तें!

कांहीं दिवस राहीन इथं. नंतर येईन तुझ्याकडे.

तुझाच

प्रकाश.

* * *



# प्रकरण १५ वें

## मर्मभेदक दृश्य

**प्रकशाची रोजनिशी—**

आज आठ दिवस झाले मला इथं येऊन. येथली ही गार हवा माझ्या तगमगणाऱ्या मनाला अन् शरीरालाही कांहींशी सुखद वाटते आहे. भडकलेल्या विचारांच्या ज्वाळा काबूंत आणायला, त्यांना मर्यादित करायला कोठल्या गोष्टीची विशेष जरूरी असते याची मानसशास्त्रीय चिकित्सा मी करीत नाहीं, अन् करण्याचें मला प्रयोजनही नाहीं.

मात्र एवढं खरं, कीं ही येथली माथेरानची हवा माझ्या व्यग्र मनावर विरंगुळांचीं पुटें चढवायला समर्थनीय आहे यांत तिळमात्र संशय नाहीं.

टेकडीवर अगर टेकडीच्या पायथ्याशीं निवांत स्थळीं एकटाच जेव्हां मी जाऊन बसतों, तेव्हां माझ्या मस्तकांत नाना प्रकारचे विचार थैमान घालतात. जणुं त्यांचा त्या लहानशा जागेंत बेफाट अन् अमर्याद नंगा नाचच चालूं असतो.

*　　　*　　　*

इंदुमती खरे ! एक नवोदित लेखिका !

अलिकडे तिचं लिखाण कां बरं मर्यादित आलं ? प्रतिभा खुंटली वाटतं तिची !—तिच्या कादंबरीवर काढलेलीं माझीं चित्रं—?

एक गोड स्वभावाची कुमारिका ! माझ्या बेफाम सुटणाऱ्या मनाला अडवायला तिच्या नेत्रांतली चमक फार उपयोगी पडत असे. खेंचणाऱ्या लगामाची तीव्रता अन् प्रखरता तिच्या त्या पाणीदार नेत्रांत खात्रीनें आहे.

हल्लीं मी चित्र काढायला घेतलं आहे.

"सागराचा क्षितिजापर्यंत दिसणारा अफाट विस्तार, नभोमंडळांत तारकांच्या मेळ्यांत विराजणारा इंदु—त्याची ती आल्हाद-दायक शीतलता—आणि सागराच्या किनाऱ्यावर, भूपृष्ठावर माझी इंदू, इंदूच्या धवलिमेप्रमाणें शोभणारी तिची पांढरीशुभ्र साडी, तिच्या मुखेंदुवरील तें शांत स्मित, ते दोनच दोन शुभ्र ज्योत्स्नेप्रमाणें विलसणारे टपोरे मोहक नाचरे नेत्र आणि त्या नेत्रांत एकवटलेली साऱ्या विश्वांतली ऋजुता, चारुता अन् मधुरता—"

इतक्यांची मिळणी मी त्या चित्रांत करणार आहे. आणि त्या चित्राला "इंदू" हेंच नांव देणार आहे.

इंदूविषयींचे विचार मस्तकांत घोळायला लागले, कीं—त्या क्षणीं मन फुलकित होतं. तिच्या स्मृतीनं सर्व शरीरावर—रोम-रोमावर—सुखद अमृताचे तुषार उडत आहेत असा भास होतो, पण नंतर तिच्या वियोगाची स्मृति झाल्याबरोबर मन आहाळून जातं. भर उन्हाळ्यांत अनवाणी चालतांना पायांना तापलेल्या वाळूचे चटके बसत नाहींत कां; तसे असह्य चटके काळजाला बसल्यासारखे वाटतात.

*  *  *

निशा—नृत्यांगना !

फारकत करून घेतली तिनें माझ्याशीं.

माझ्याशीं जन्म घालवायचा नव्हता, फारकत करून घ्यायची होती तर लग्नाच्या फंदांत तरी कां पडलीस तूं ? कां मी विचारलं म्हणून ? म्हणजे, माझी विचारणा चुकीची झाली तर एकूण ? मी मात्र व्यर्थ आयुष्याला होरपळवून टाकलं. ना प्रेम ना कांहीं; शरिराच्या अतृप्त गरजेच्या एका क्षणीं झालेल्या अतृप्त तृप्तीसाठीं आणि केवळ मनाच्या चांगुलपणासाठीं मी तुझ्याशीं लग्न केलं. आणि तूं मात्र राजरोसपणें माझ्या उघड्या आयुष्यावर जळजळीत निखारे ठेवलेस !—असो; तुझी मर्जी !

*  *  *

स्मृतींच्या आहाळेनं चित्ताची व्यग्रता वाढते. मन अस्वस्थ होतं. कुठल्याच कामाचं भान राहात नाहीं.

दुपारीं, माझे येथील एक परिचित स्नेही खोलीवर आले होते. बरेच रंगेल अन् षोकीन आहेत ते.

गांवांत एक नृत्यांगना आली आहे, आणि उद्यां तिचं येथल्या कौशिकराम शेठच्या बंगल्यावर नृत्य आहे असं त्यांनीं मला सांगितलं.

कौशिकराम शेठ म्हणजे येथचं बडं प्रस्थ ! मुंबईचे प्रसिद्ध सटोडिआ ! मुंबईला त्यांची मोठी पेढी आहे. देण्याघेण्याचे व्यवहार लाखोंनीं चालतात. आणि आश्चर्याची गोष्ट अशी, कीं हा सारा व्याप—ही सारी श्रीमंती केवळ सट्ट्यावर—आंकड्यावर—लाभलेली आहे.

सट्टा खेळणाराला—आंकड्यावर आंकडेबाजी करणाराला—कोणतीं व्यसनं नसतात ? त्याच्या अनुसंधानानं येणारीं सारीं व्यसनं बहुधा यांना असतातच ! व्यसन, मग कोणतेंही एक असो; प्रथम तें एका पायानं आंत येतं आणि हळूहळू सूर्याच्या सहस्रावधी करांप्रमाणें तें आंपले सारे पाय पसरीत आयुष्याची जागा अडवून ठेवतं. एवढ्यांत मनुष्य खंबीर मनाचा असला, अफाट धैर्याचा अन् वळे पडेल तेव्हां व्यसनांना आपल्या कह्यांत ठेवण्याइतक्या संयमी मनाचा असला, तर मात्र त्या व्यसनांचा जाच असह्य होत नाहीं, आणि तसा नसेल तर मात्र ......???

या कौशिकराम गुजराथी सटोडिआलाही हीं सारीं व्यसनं आहे-तच. दारूचं व्यसन आहे. बाटलीबाई प्रमाणंच ‘ बाईचं ’ही व्यसन आहेच. पण बेट्याचं नशीब शिकंदर असं, कीं कधीं त्याच्या इच्छा अपुऱ्या राहिल्या नसतील.

त्याच्याचकडे ही कोठली नृत्यांगना आली आहे म्हणे ! आणि उद्यां तिचं नृत्य होणार. नृत्याला अवास्तव अन् भुक्कड माणसांना परवानगी नव्हती. तेव्हां शंका आली मला, कीं आपणाला परवानगी मिळेल कां ? पण माझी ही शंका दूर झाली. माझा हा येथला परिचित स्नेही त्याच्या प्रभावळींतलाच असल्यानें मला नृत्याला हजर राहणं सहज सुलभ होतं.

नृत्यांगना !

ही नृत्यांगना कोण ?

एकादी प्रसिद्धी पावलेली कलावंत नृत्यांगना आहे, कीं कोणी अल्लड यौवनांतली, सळसळणाऱ्या वृत्तीची, अनास्वादित तनूची अप्रसिद्ध वारांगना आहे ?

कीं ' माझी ' निशा ?—!!!

निशा ?

छे, कसं शक्य आहे तें ?

माझ्याशीं विवाह होण्यापूर्वींपासूनच तिनें तो पेशा सोडला होता. खाजगी रीतीनें अन् माझ्या आग्रहाखातर फक्त माझ्याच समोर तिनें कांहीं वेळीं नृत्य केलं असेल, तेवढंच ! पण त्यावेळीं ना पेटी, ना तबला, ना इतर नृत्योपयोगी वाद्यं व साधनं ! अशा स्थितींतलं तें तिचं नृत्य मोहक असलं तरी त्यांतली माधुरी कनिष्ठच वाटत होती. कुशल नटाच्या रंगहीन चेहऱ्यावरील अभिनयांत आणि रंगविल्यानंतरच्या चेहऱ्यावरील अभिनयांत जो फरक जाणवतो,

तोच फरक त्यावेळच्या निशाच्या वाद्यहीन-पैंजणहीन नृत्यांत जाणवला होता.

निशानें नृत्याचा व्यवसाय सोडला होता. मग आतां ती येथें आली असणं शक्यच नाहीं. शिवाय ती आपल्या आईच्या सल्ल्यांत व्यग्र झाली असेल, तेव्हां तिला इकडे येण्याला फुरसद तरी कशी मिळणार ? आणि जरी समजा, आली; तरी ती नृत्याला तयार झाली असेल हें मात्र शक्य नाहीं.

कांहींही असो, सध्यांच्या व्यग्र मनस्थितीला विरंगुळा वाटावा म्हणून मी नृत्याला जायचं कबूल केलं. चित्रकार म्हणजेही एक कलावंतच. कलावंताला कलेची आसक्ति असणारच. नृत्य ही एक कलाच-ललित कलाच. मला नृत्यकलेची भुक्ती होतीच.

*          *          *

“ गृहस्था, किती उशीर केलास ? जरा आधीं दोन तीन दिवस आला असतास तर ? ”

गुणवंतानें माझ्या पाठीवर थाप मारून म्हटलें.

मी बॅग वगैरे ठेवली, बेडिंग नीट ठेवलं, हमालाला पैसे दिले आणि कोट टोपी काढून भिंतीशीं पसरलेल्या गादीवर ‘ हुश्श ’ करीत बसलों.

अद्यापि त्याचा चहा व्हायचा होता. त्यानें पावडर काढली, माझ्या हातावर ठेवीत म्हणाला-“ जा, अद्यापि तुझं शौच-मुखमार्जन झालं नसेल तर उरकून घे ! जा लौकर. ”

सकाळीं सहाला जी पॅसेंजर पुण्याला येते, त्या गाडीनें मी पुण्याला उतरलों होतों.

मी तोंड वगैरे धुवून आंत आलों, तों गुणवंतच स्टोव्ह आणि चहाचें इतर सामान आपल्या पुढ्यांत घेऊन बसला आहेसं दिसलं मला. मी विचारलं—"हें रे काय ? तूंच चहा करायला लागलास; आणि आमच्या नव्या वहिनी कुठं गेल्या ?"

"जरा आधीं दोन दिवस आला असतास तर दिसली असती तुला ती. आतां गेली आहे माहेरीं."

पाठराखण म्हणून बरोबर आलेली तिची बहीण आजारी पडली अन् तेवढ्यासाठीं बहिणीला घेऊन परत जाणं आवश्यक म्हणून ती परत गेली असं मला चहा घेतांना कळलं.

मीही असा अकस्मिकच एकदम कसा आलों तें त्याला सांगितलं. सांगतांना माझी मनस्थिती कशी असेल तें फक्त माझें मलाच माहीत.

*　　*　　*



# प्रकरण १६ वें

निशेचा मृत्यू

## दैनिक दांडू

मुंबई—येथील सुप्रसिद्ध गायिका आणि नर्तिका श्रीमती निशादेवी यांनीं कालरोजीं आत्महत्या करून घेतली अशी आज माथेरानहून बातमी आली आहे. "प्रकाश आर्ट स्टुडिओ"चे चालक श्री. प्रकाश यांच्याशीं त्यांचें लग्न झालें होते, परंतु नुक्तीच त्यांनीं फारकत करून घेऊन पुन्हां आपल्या आवडत्या नृत्यव्यवसायास सुरवात केली होती. दोन दिवसांपूर्वीं कौशिकराम शेट यांच्या आग्रहावरून त्या माथेरानला गेल्या होत्या, परवांचे दिवशीं त्यांचा तेथें नृत्याचा प्रयोग झाला होता. पुढें काय झालें हें कळलें नाहीं. सकाळीं उठल्यानंतर पाहातात तों निशादेवी घरांत नसल्याचें आढळून आलें. तितक्यांत 'रेल्वेखालीं सांपडून एका स्त्रीचा मृत्यू' अशी बातमी येऊन थडकली म्हणून स्वतः कौशिकराम शेट तें

पहाण्यासाठीं रेल्वेवर गेले. तों त्या ठिकाणीं त्यांना निशादेवींचेंच तें प्रेत असल्याचें दिसलें. अधिक पोलिसतपास चालू आहे.

*  *  *

सकाळीं गुणवंतानें ही बातमी वाचली आणि कांहींशा आश्चर्यानें तर कांहींशा खेदानें त्यानें ती प्रकाशला वाचून दाखवली. प्रकाशला मात्र ती बातमी वाचून दुःख झालें. पण तें दुःख निशाच्या मृत्यूबद्दलचें नसून बातमींत त्याच्या नांवाचा उल्लेख केला होता त्याबद्दलचें होतें. लहान मुलें सहज खेळ म्हणून कित्येक वेळीं लहान लहान धोंडे हवेंत भिरकावतात, पण त्यांतला असा एकादाच धोंडा सहजपणें क्वचितवेळीं एकाद्या पाखराला लागतो आणि मग तें घायाळ होतें. बिचाऱ्या बातमीदाराला कल्पनाही नसेल, कीं आपण लिहिलेल्या बातमीनें आपण अशाच एका हृदयाला घायाळ करीत आहोंत. प्रकाश खरोखरीच घायाळ झाला होता.

आणि नाहीं तरी नेहमीं असंच होत असतं. पायाला जबर ठेंच लागून दुःख झालेलं असतं, म्हणून चालतांना जों जों त्याला जपावं तों तों त्याला अधिक धक्के अन् ठेंचा लागतात अन् तें जास्तच दुखावतें. निशेच्या नांवालाही आतां शक्य तों टाळूं पाहाणाऱ्या प्रकाशला निशेचं नृत्य, आणि तें पाहिल्यानंतर झालेला मनस्तापही पुरता ओसरतो न ओसरतो तोंच पुन्हां तिच्या मृत्यूच्या बातमींतच स्वतःच्या नांवाचा उल्लेख ! या साऱ्याचा परिणाम त्याच्या मनावर होणें साहजिकच आहे. बिचाऱ्या गुण-

वंसला मात्र प्रकाशचा चेहरा पाहून उगाच त्याला ती बातमी वाचायला दिली असं वाटलं अन् कांहींसा खेदही झाला.

*　　　*　　　*

माथेरानला असतांना प्रकाश ज्या कौशिकराम शेटजींच्या बंगल्यावर आपल्या स्नेह्याच्या आग्रहाखातर आणि स्वतःच्याही त्रस्त व व्यग्र मनाला रंजविण्याखातर नृत्याला गेला होता त्या ठिकाणीं त्याला नृत्य करणारी नर्तिका दुसरी तिसरी कोणी नसून आपली निशाच आहे हें दिसून आलें. ज्या आशेनें तो तेथें गेला होता, ती आशा तर सफळ झाली नाहींच, उलट त्याचें मन त्या अकल्पित अन् अनपेक्षित प्रसंगानें व्यग्रलेंच जास्त. तो अत्यंत विषण्ण अवस्थेंत तेथून उठून आला होता. आपल्या बिऱ्हाडीं आल्यानंतर तेथेंसुद्धां त्याला चैन पडेना ! त्यानें कशीबशी वळकटी पसरली अन् अंग टाकून दिलें. पण झोंप येईना त्याला. तगमग तगमग व्हायला लागली त्याला. तो सारखा या कुशीवरून त्या कुशीवर लोळत राहिला. या अवस्थेंत तो आणखी बराच वेळ राहिला असता; पण कोठपर्यंत ? जोंपर्यंत त्याला गुणवंताची आठवण झाली नसती तोंपर्यंत ! मनुष्याच्या मनाची अशी एक प्रवृत्तीच आहे, कीं आत्यंतिक सुखाच्या अगर दुःखाच्या प्रसंगीं, विचारांच्या वातचक्रांत त्याला जर कशाची प्रथम आठवण होत असेल, तर त्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या जिव्हाळयाच्या मित्राची ! प्रकाशची मनोवृत्ती याला कशी अपवाद असूं शकणार ? साहजिकच त्याला गुणवंताची आठवण झाली. आणि त्या

आठवणीबरोबरच लागलीच तो उठला, आपलें सामान त्यानें कसें-बसें गोळा केलें आणि तडक स्टेशन गांठलें.

यावेळीं रात्रींचे अवघे दोन वाजले होते. गाडी नुक्तीच स्टेशनच्या आवारांत शिरत होती. प्रकाशनें बुकिंग ऑफिसरकडून झटकन् तिकिट घेतलें अन् तो गाडींत येऊन बसला.

* * *

आपल्या आईवरील आरोप नाहींसा व्हावा म्हणून निशानें ज्या ज्या गोष्टी केल्या त्या साऱ्या व्यर्थच झाल्या ! आणि अखेर तिची आई आरोपी ठरून तिच्यावरील गुन्हा शाबीत झाला व तिला त्याबद्दल जन्मठेपेची शिक्षा सुनावली गेली.

या गोष्टीचा निशाच्या मनावर अनिष्ट परिणाम झाला. गणपती करायला म्हणून चिखलाच्या गोळ्याशीं खेळूं लागावें, तों अखेर माकडांत रूपांतर होऊन मन विदारून जावें, तसें तिच्या मनाचें झालें. केवळ आईच्या मुक्ततेसाठीं तिनें आपल्या साऱ्या सत् आकांक्षांचा स्वहस्तानें चुराडा केला होता. एकनिष्ठ राहून आयुष्य उत्तम रीतीनें व्यतित करावयाचें असें जें तिनें आपल्या मनाशीं ध्येय ठरविलें होतें, तें ध्येय-? तिनें स्वतःच त्या ध्येयाला पायांतळीं तुडविलें होतें ! स्वतःच्या प्रिय माणसांच्याच नव्हे, तर स्वतःच्या मृत्यूपेक्षांही मनुष्याच्या आयुष्यांत अत्यंत दुःखाचा प्रसंग असा जर कोणता असेल, तर तो स्वतःच्या ध्येयांना मरण आलेलें पाहाण्याचा ! पण याही दुःखाचा अवजड अन् असह्य भार, पाषाणापेक्षांही आपलं मन घट्ट करून तिनें सहन केला, ते फक्त एकाच आशेनें-आईची मुक्तता—? पण आज—???

एकनिष्ठ राहण्याची तिची आशा सफल तर झाली नाहींच, पण ज्यासाठीं तिनें आपल्या या आशेला तिलांजली दिली त्या तिच्या प्रिय आईचीही मुक्तता झाली नाहीं !

आणि मग—?

इतक्या गोष्टी घडून आल्यानंतर तिला आतां दुसरा मार्गच उरला नव्हता. कौशिकराम शेटचें विलास अन् भोग–दास्यत्व तिनें अखेर पत्करलें आणि ती त्यांच्यासह माथेरानला आली. कौशिकराम शेटजींना तिला नाचायला येतें हें माहीत झालें आणि त्यांनीं तिला त्याबद्दल आग्रह केला. अखेर 'नाहीं–होय' करतां करतां तिनें त्यांचें म्हणणें कबूल केलें. पण कार्यक्रम अगदीं खाजगी स्वरूपांत व्हावा अशी इच्छा प्रदर्शित केली. शेटजींनीं ती मान्य केली. अगदीं निवडक स्नेहीमंडळींना आमंत्रण दिलें गेलें. आणि कार्यक्रम मुक्रर झाला.

बिचारी निशा–? तिला काय कल्पना, कीं इथं आपलें प्रकाश आले असतील, आणि ते आपल्या नृत्याला हजर राहतील ! पण या अघटित स्थित्यंतराच्या समूहानें भरलेल्या जगांत जर खरीं आश्चर्यें कशानें निर्माण होत असतील, तर अकल्पित अन् अनपेक्षित घडून येणाऱ्या योगायोगानेंच !—तिच्या नृत्याला प्रकाश आला–दोघांची दृष्टादृष्ट झाली—?

*    *    *

आत्यंतिक मनस्तापानें इकडे प्रकाश जसा तळमळत होता, तद्वतच निशाही तिकडे तळमळत होती. ती हीन–कुटिल हेतूच्या

आहारीं गेलेली एक हीन दर्जाची स्त्री नव्हती, तर प्रामाणिक अन् हळुवार मनाची स्त्री होती. प्रकाशशीं प्रतारणा करावी अशी तिची प्रामाणिक इच्छा नव्हतीच मुळीं ! पण परिस्थिति म्हणून एक प्रचंड शक्ती या जगांत आपला नंगानाच अहोरात्र घालते आहे, त्या शक्तीनें नमवायला लावलं निशेला ! आणि ती नमली. तरीही तिनें प्रकाशांची प्रतारणा करायचीच नाहीं असें ठरविलें आणि फारकत करून घेतली तिनें त्यांशीं. आपण एक अक्षम्य चूक करीत आहोंत याची जाणीव तिच्या प्रामाणिक मनाला नव्हती असें नव्हे; पण प्राप्त परिस्थितीपुढें तिचा मुळीं इलाजच नव्हता. मनुष्याच्या हांतून चूक घडून येत नाहीं असं थोडंच आहे ? पण प्रामाणिक माणसाच्या मनांत ती सारखी प्रस्फुरत राहात असते. तशीच अवस्था निशेच्या मनाची झाली होती. तिला आपल्या चुकीची जाणीव होती आणि तिची टोंचणीही तिच्या प्रामाणिक मनाला असह्य करून सोडीत होती. झालेली चूक केवळ प्रकाशशीं प्रतारणा करावयाची नाहीं याच हेतूनें तिनें ती होऊं दिली होती. पुढें ही चूक सुधारतां येणार नाहीं हीही जाणीव तिच्या मनाला होती, पण ज्या आशेसाठीं तिनें हें सारं केलं होतं ती आशा सफळ झाली असती, तर आईच्या पंखाखालीं तिनें आईच्या हयातींत काळ कंठला असता ! पण आतां तेंही नाहीं आणि हेंही नाहीं अशी मोठी अनुकंपनीय स्थिति तिची झाली होती. आणि अखेर याच अनुकंपनीय स्थितीच्या प्रचंड प्रवाहांत वाहात वाहात जातांना तिनें कौशिकराम शेटजींचे दास्यत्व पत्करून पुढील काळ अज्ञातवासांत घालवायचा असें तिनें ठरविलें आणि तें अमलांत आणलेंही.

पण आज—नृत्याचे वेळीं प्रकाशला पाहिल्यावर तिच्या मनाची एकाग्रता ढळली न् व्यग्रता जी वाढली, ती इतकी कीं तिची मजल, अखेर नृत्य थांबविण्यापर्यंत अन् पुढें भडकलेलें माथें शांत करण्यासाठीं अपरात्रींच उठून एकेटच भटकायला जाण्यापर्यंत वाढली. त्या फिरायला जाण्यांतच तिचा अंत झाला. आत्महत्या करण्याची तिची इच्छा नव्हती. तेवढ्यासाठीं ती बाहेर पडलीही नव्हती, पण तिच्या भडकलेल्या माथ्याला आपण कोठें आलों आहोंत हें कळलें नाहीं. आणि अखेर याच बेभान अवस्थेंत तिचें शरीर आगगाडीखालीं सांपडलें व त्यांतच तिचा अंत झाला.



## प्रकरण १७ वें

### मीनाक्षी

प्रकाश आपल्या प्रिय मित्राच्या–गुणवंताच्या घरीं आला. पण त्या आधींच गुणवंताची पत्नी,–एकाएकीं तिची बहीण आजारी पडली आणि परत मुंबईला जाण्याचा तिनें अट्टाहास धरला म्हणून–तिच्यासह मुंबईला निघून गेली होती.

आपला मित्र–प्रकाश–फारां दिवसांनीं आपल्या भेटीला आला म्हणून गुणवंतानें त्याची बडदास्त तर उत्तम ठेवलीच, पण दोनच दिवसांपूर्वी आपली पत्नी परत गेली होती, तरी त्याकडे दुर्लक्ष करून त्यानें तिला तातडीनें परत येण्यासाठीं पत्र लिहिलें. आपला मित्र प्रकाश याची मनस्थिति सध्यां नीटशी ताळयावर नाहीं हे तो जाणून होता, तेव्हां जसा हा आतां अकल्पित एकदम आला

तसाच पुन्हां निघूनही जाईल कदाचित् असें त्यास वाटलें म्हणून त्यानें पत्नीला परत येण्याबद्दल तांतडीनें बोलावणें केलें. हेतू हा, कीं अनायासें आला आहे, तेव्हां त्याला आपली पत्नी पाहायला मिळावी. पण त्याच्या या पत्रानें त्याची पत्नी परत आली काय ? नाहीं. उलट त्या पत्राचें उत्तर आलें तेंच मुळीं हृदयविदारक !

* * *

डॉक्टरनें नाडी तपासली, रोग्याची आणखी पाहाणी केली, आणि आंबट तोंडानें धीर देण्यास सुरवात केली. पण ते त्यांचे धीराचे शब्द—त्यांत किती जोर अन् सत्यता भरलेली असेल याची जाणीव तेथल्या माणसांना झाली नसेल असें नव्हे !

आतां लौकरच प्राण कुडींतून जाणार याची पूर्ण जाणीव तेथल्या माणसांना झाली, पण तितक्यांत त्या रोगी व्यक्तीनें आपले क्षीण डोळे उघडले, चहूंकडे पाहिलं...अन्...?

ती रोगी व्यक्ती म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून मीनाक्षी खरेच होय !

तिनें आपल्या बहिणीस—इंदूस जवळ बोलावलें; इंदु जवळ आली, अगदीं तिच्या जवळ, तिला खेटून बसली. तिनें तिचा गार पडत चाललेला हात उचलला आणि "काय ताई ?" असें म्हणून तो दाबला.

मीनाक्षीनें हलकेच क्षीण आवाजांत सांगितलें—" इंदु, मी चाललें ! आतां मी फार काळ जगणें शक्य नाहीं—"

"ताई, ताई अभद्र बोलं नकोस ग असं ! अवसेचा दिवस,

त्यांतून तिनीसांजेची वेळ अन् कसलं अभद्र—" पुढे तिला बोलवेना. तिचा गळा दाटून आला, अन् डोळ्यांवाटे अश्रूंचा पूर लोटला.

" इंदू , मला पश्चात्ताप झाला आहे. मी माझ्या पतीशीं बेइमानपणें वागलें. ही चूक झाली माझी. मी तशी वागायला नको होत्यें. भावनेच्या भरांत माझ्याकडून ती चूक झाली. यौवनाची उन्मत्तता, भावनेची प्रखरता, संयमाची दुर्बलता आणि न मिळणाऱ्या व न उपभोगलेल्या सुखाचा हव्यास–या साऱ्यांच्या एकजीव मिळणीनें माझ्या आयुष्याचा चुथडा झाला. झाली चूक भरून काढायलाच हवी. प्रत्येक गोष्टीला शेवट आहेच. ' हांसत कर्म करावें, रडत तेंचि भोगावें ' हें खरं आहे ! स्वतःच्या दुर्दम वासनापूर्तीसाठीं कर्म केलं, त्याचं फळ भोगलंच पाहिजे. किती झालं तरी ते माझे पती आहेत. क्षणभराची चूक झाली म्हणून आर्यधर्म सोडूं का ? क्षणैक सुखाला भावना विवशतेनें बळी पडलें म्हणून पतिव्रताधर्माला पारखी होऊं का ? नाहीं; इंदू, तसें केल्यानें मला सद्गति मिळणार नाहीं. लालसाप्रबलतेनें क्षणैक सुखाला बळी पडले, पातिव्रत्याला मुकलें. इंदू , पति आणि पतीधर्म यांच्या आठवणीनें जीव व्याकळून जातो, जिवाला असह्य यातना होतात. केल्या कर्माची शरम वाटूं लागते, पश्चात्ताप होतो आहे. माझ्या वृत्तींत असा हा एकाएकीं फरक कां झाला, मला पश्चात्ताप कां वाटूं लागला, याबद्दल तुला आश्चर्य वाटेल. पण खरोखरी आश्चर्य वाटण्यासारखं असं कांहीं नाहीं. माझ्या वृत्तींत फरक व्हायला तसेंच कारण घडून आलें आहे. पुरुषांच्या स्वार्थी मनोवृत्तीच्या प्रत्यक्ष अवलोकनानें अन् अनुभवानें माझ्या वृत्तींत असा फरक

झाला आहे. मृत्यूच्या मांडीवरून ओढून काढण्याइतकी समर्थ असणारी हेमगर्भाची मात्रा म्हणून जिला मी जवळ केलं, तीच अखेरीस जित्या जिवाला जिवंतपणीं जाळणारी बचनागाची कांडी आहे हेंच प्रत्ययाला आलं माझ्या ! मला आतां एवढं कळून चुकलं आहे, कीं मनुष्य जर कशाचा गुलाम असेल, तर तो सुखाचा— सुखाच्या आसक्तीचा ! जोंपर्यंत सुख मिळावें म्हणून अपेक्षा करतों, तोंपर्यंत आपण गुलामच असतों. या गुलामगिरींतून सुटण्याचा एकच मार्ग आहे, तो म्हणजे ‘अनासक्त’ होणें हाच होय ! माझं हें म्हणणं ऐकून लोक हंसतील. ‘करून सवरून भागली अन् देव-पूजेला लागली’ असं तिरस्कारानं म्हणतील. पण करून सवरून भागणारेच देवपूजेला लागतात. त्यांनाच देवाच्या आस्तित्वाची खरी जाणीव होते. तुकारामबुवांची, पूर्वायुष्यांत विरक्तीविरोध वर्तणूक होती, म्हणूनच त्यांना विरक्ती सुचली हें खरं आहे. तसंच आहे हें.—मी जें करायला नको होतं तें केलं. आतां काय उपयोग त्याचा ? झालं गेलं होऊन गेलं. आतां त्याबद्दल मला जास्त हळहळायचं नाहीं. माझा वाईटपणा मला त्यावेळीं कळून आला नाहीं. मी करतें हें चांगलं कीं वाईट याचा मी विचार केला नाहीं. स्वार्थांधतेनें एकाच बाजूकडे—स्वतःच्याच इच्छापूर्तीकडे-लक्ष वेधलें. मी माझ्या इच्छेची दासी झाल्यें; धनी झाल्यें नाहीं. इथेंच माझ्या दुःखाचें खरें मूळ आहे. मला माझ्या दुःखाच्या यातना सहन केल्याच पाहिजेत.

स्वतःच्या मापानें मी विश्व मोजण्याचा यत्न केला, पण स्वतःची परीक्षा स्वतःला निरिच्छ झाल्याविना केव्हांही करतां येत नाहीं, हेंच खरें आहे.

माझ्या चुका मला कळल्या आहेत. पण आतां त्यांची वाच्यता करण्यांत कांहीं फायदा नाहीं. तसें केल्यानें त्या नाहींशा होणार नाहींत. तर त्या नाहींशा करण्याचा मला जास्तींत जास्त प्रयत्न केला पाहिजे.

मी बेइमान झाल्यें, साहजिकच माझा संबंध बेइमानाशीं जडला. देवानें मला योग्य शासन दिलं. माझी पायरी सोडून मी खालीं आलें, खालीं—खालीं—खोल गर्तेंत पडणार मी हें निश्चित आहे.

गुणवंतराव माझ्याशीं इमानीपणानें वागतील अशी माझी समजूत होती, ती भ्रामक ठरली. त्यांनीं लग्न केलं—तुझ्याशीं लग्न केलं, आणि त्या लग्नानें त्यांनीं आपला बेइमानी स्वभाव माझ्या प्रत्ययाला आणून दिला. त्यांनीं तसं केलं नसतं, तर मला पश्चात्ताप झाला नसता कदाचित्, आणि पतिधर्माची जाणीवही झाली नसती कदाचित्! पण त्यांनीं केलं तेंच योग्य केलं. मला माझ्या किळसवाण्या कृत्याची जाणीव तरी झाली हेंच त्यांचे मजवर उपकार झाले.

नको,—आतां अगदीं असह्य झालं आहे हें जीवन! इंदू, आतां मी फार वेळ वाचेन असा भरंवसा नाहीं मला. माझं म्हणणं पुरतं ऐकून घेतलंस ना? आतां मला एकच गोष्ट सांगावयाची आहे. ती सांगितली म्हणजे मग मला सुखानें मरण येईल. मला माझ्यासाठीं हें सांगवयाचें नाहीं; अखिल हिंदू स्त्रियांसाठीं हें सांगावयाचें आहे. नीट लक्ष देऊन ऐक.

कित्येक स्त्रियांचीं लग्नं त्यांच्या इच्छेविरुद्ध झालीं असतील, कित्येकींचीं लग्नं त्यांना नकळत भलत्याच पुरुषांशीं झालीं असतील,

कित्येक फसल्या असतील, कित्येकींना त्यांचें दौर्बल्य त्यांना ठेंचीत असेल. त्या साऱ्यांचा संसार सुखाचा होणें शक्य नाहीं हें उघड आहे. तेवढ्यासाठीं घटस्फोटाची मान्यता आपल्या समाजांत रूढ होईल अशी खटपट कर! इंदू, तूंच घटस्फोटाच्या मागणीचा पहिला झेंडा उभा कर! घटस्फोटाची मान्यता जर आपल्या समाजांत रूढ झाली असती, तर हें असलं लाजिरवाणं जिणं घेऊन मी जगलें नसतें....इंदू, साऱ्या स्त्रीजातीला ओरडून सांग, कीं तुम्हींच साऱ्या जगाच्या खऱ्या उद्धारकर्त्या आहांत. तुम्ही अशा पारतंत्र्यानं जखडून जाऊं नका; स्वतंत्र व्हा, खटपट करा, आणि हव्या व आवश्यक असणाऱ्या सुधारणा अमलांत आणण्याचा प्रयत्न करा.

इंदू, कायदेकौन्सिलमध्यें प्रवेश करून घे. घटस्फोटाचं बिल पास करून घे. जोंपर्यंत प्रचलित विवाहपद्धतींत इष्ट तो बदल घडून येत नाहीं, तोंपर्यंत हा सांवळागोंधळ चालायचा थांबणार नाहीं. जोंपर्यंत सुखाला इष्ट तो राजरोस मार्ग मिळत नाहीं, तोंपर्यंत अंधारातले चोरटे खेळ थांबणार नाहींत. तेव्हां असं कांहीं होऊं नये असं वाटत असेल तर समाजानें कांहीं तरी मार्ग खुला करावा हें इष्ट आहे. व एवढ्यासाठीं तूं खटपट कर. स्त्रियांच्या सभा भरवीत जा मासिकांतून व वृत्तपत्रांतून लेख देऊन स्त्रीस्वातंत्र्याची आणि स्त्रियांच्या हक्कांची पायमल्ली होऊं नये अशी अव्याहत खटपट करीत राहा, इंदू, करशील ना हें कार्य ‘ पोटांत दुखेल, तोच ओवा

मागेल ' हें खरें आहे. स्त्रियांनीं स्वतः जातीनें खटपट केल्याशिवाय स्त्रीवर्गाची सुधारणा होणें शक्य नाहीं.—"

एवढें बोलली ती, पण एवढ्यांतच तिला विलक्षण दम लागला. अतिशय श्रांत झाली ती, अन् ती श्रांतता घालविण्यासाठींच कीं काय, क्षणभर तिनें आपले डोळे मिटून घेतले. उजवा हात छातीवर ठेवला अन् श्वास सोडला. पुन्हां कांहीं वेळानें तिनें डोळे उघडले—
" पाणी—"

इंदूनें लागलीच तिच्याचसाठीं ठेवलेलें शेजारच्या भांड्यांतील साळीच्या लाह्यांचें पाणी तिला दिलें—

मीनाक्षीनें अगदीं क्षीण आवाजांत आणि तुटक शब्दांत अडखळत अडखळत तिला जें सांगायचें होतें तें सांगितलें आणि अखेरचा ' पाणी ' हा उच्चार करून तिनें प्राण सोडला !

* * * *

हृदयविदारक असं जें पत्राचं उत्तर आलं म्हणून वर उल्लेख केला, तें उत्तरीं पत्र म्हणजे—मीनाक्षीच्या मृत्यूची बातमीच होय !



## प्रकरण १८ वें

### कला

मीनाक्षीच्या मृत्यूला आतां दोन महिने होत आले. अद्याप-पावेतों इंदुमती माहेरींच आहे. मीनाक्षीच्या—प्रिय भगिनीच्या—मृत्यूनें जसें तिला आत्यंतिक दुःख झालें, तसेंच ज्या आपल्या बहिणीला खुद्द पतीपासून खऱ्या वैवाहिक सौख्याचा आस्वाद घेण्यास अशक्य झालें—आणि त्या अशक्यतेच्या परमावधींतून तिचें प्रेम ज्या इसमावर बसलें, तो इसम म्हणजेच आपला पती होय या चमत्कारिक योगायोगानें तिला आत्यंतिक दुःख झालें होतें.

मध्यंतरींच्या अवधींत गुणवंताचीं तीन पत्रें आलीं असूनही इंदूनें जाण्याची हेतुपुरस्सर टाळाटाळ केली तीही याच कारणामुळें. तिला वाटत होतें, कदाचित आपल्या पतीला 'पूर्वायुष्यांतील उलाढाल अन् घडामोड पत्नीला कळली नसेल. जरी पत्नीची ती खुद्द बहीण

असली, तरी ही गोष्ट अशी नव्हे, कीं त्याचा पाढा तिनें खुलेपणानें बहिणीजवळ वाचावा, आणि स्वतःच्या कृतीचें गौप्यस्फोटन करून त्यापासून बहिणीला दुःखी करावें. तेव्हां साहजिकच आपल्या पत्नीला ही गोष्ट माहीत झाली असणं शक्य नाहीं '—असेंच वाटत असेल. त्यांना जाणीवही झाली नसेल, कीं आपल्या पत्नीला या गोष्टीची जाणीव झाली आहे.

पण खुद्द मीनाक्षीनें जेव्हां ही गोष्ट आतां आपण आपल्या बहिणीला सांगून टाकलीच पाहिजे असा विचार केला, तेव्हां यापासून बहिणीचें आयुष्य दुःखी होईल, मग आपण तिला सांगूं नये असं वाटलं नसेल काय ? पण तिला हें माहीत होतं, कीं आपल्या बहिणीचें लग्नापूर्वीच दुसऱ्या एका तरुणावर प्रेम बसलें होतें, पण दुर्दैवानें ती सुखी होऊं शकली नाहीं. शिवाय खुद्द इंदूनेंच पत्रांतून ' यापुढें कुठल्याही तरुणाशीं विवाहबद्ध झाल्यें तरी मी सुखी होऊं शकणार नाहीं. " असें लिहिलें होतें. तेव्हां आतां अशा स्थितींत आपण आपल्या मनांतली खळबळ प्रामाणिकपणें इंदूजवळ व्यक्तवायला कांहींच हरकत नाहीं असा साहजिक तिनें विचार केला आणि— ?

* * *

आज अगदीं निर्वाणीचें पत्र आलें होतें गुणवंताचें. आणि इंदूही जाण्याला तयार झाली. आपल्याला कांहीं कळलें आहे असें कुठल्याही प्रकारानें व्यक्तवायचें नाहीं अशीच—जणूं पूर्ववत्-वर्तणूक तिथं गेल्यावर ठेवायची असें इंदूनें ठरविलें आणि मगच तिनें सामान–सुमान बांधण्यास सुरवात केली.

* * *

या दोन महिन्यांच्या अवधींत प्रकाश परत मुंबईला गेला होता. त्याला गुणवंताच्या घरींही चैन पडेना! पुन्हां परत येईन असें आश्वासन देऊन तो मुंबईला आला होता.

तो इतका अस्वस्थ झाला होता, कीं जणूं त्याची वागणूक पाहून एकाद्यानें तो वेडा आहे असें म्हणावें.

त्या मूढावस्थेंतच त्यानें एक चित्र काढलें. त्या चित्रांत त्यानें—रम्य संध्याकाळच्या पार्श्वभूमीवर खळखळणाऱ्या समुद्राच्या अस्थिर लाटांचा नाच दर्शविला होता. त्या समुद्राच्या अस्थिर लाटांवर अस्पष्ट स्त्रीची आकृति चितारली होती. दूरच्या भागावर दुसरी एक स्त्री आकृति चितारली होती. पैकीं पहिल्या आकृतिजवळ एक पुरुषाकृति असून ती त्या स्त्रीला धरते आहे, पण ती स्त्री जाणून बुजून दूर दूर सरत आहे असें दर्शविलें होतें. मात्र त्या पुरुषाकृतीची नजर त्या दूरस्थ स्त्री-आकृतीवर स्थिरावली होती. आणि विशेष हें कीं त्या दूरच्या स्त्री-आकृतीचीही नजर यावरच्च स्थिरावली असून दोन्ही नजरेंत विलक्षण आर्तता आणि प्रेमभाव यांचें मिश्रण झालेलें होतें—.

त्याला नकळतच त्या तिन्ही आकृतींचे चेहरे वास्तवपूर्ण चतुराईनें चितारले गेले होते. त्या पुरुषाकृतीच्या चेहऱ्यांत खुद्द त्याच्या स्वतःच्याच चेहऱ्याशीं बरेंच साम्य जुळून आलें होतें. आणि जवळच्या स्त्री-आकृतींत इंदूच्या चेहऱ्याशीं साम्य जुळत होतें. त्यानें त्या चित्राला नांव दिलें होतें—"ओढ."

आपल्या मनांत हा वेळ पावेतों जीं दुःखं दडवून ठेविलीं होतीं,

तीं सारीं दुःखं त्या चित्राच्या रूपानें त्यानें ओकून टाकलीं होतीं. त्याच्या मनांत बोलून दाखवायला अशक्य असलेल्या ज्या कांहीं आकांक्षा नि आंदोलनं निर्माण झालीं होतीं तीं सारीं सारीं त्या चित्राच्या रूपानं व्यक्त झालीं होतीं. प्रत्यक्ष व्यवहारांत कधींही सफल न होणाऱ्या रोजच्या स्वप्नांचें तें प्रत्यक्ष चित्रण होतें. त्यांत सारी आर्तता, सारें सौंदर्य आणि ओजही प्रकटलें होतें.

चित्र पुरें झाल्यानंतर त्यानें एकाग्रतेनें अगदीं निरखून त्या चित्राकडे पाहिलं. आणि तत्क्षणींच त्याच्या डोळ्यांतून टप् टप् टिपें गळालीं. त्याला जाणीव झाली आपल्या कलेची.

कला ? होय कला ! दुःखी जीवाला जास्तच हळुवार करणें, आनंदी जीवाला जास्त प्रमुदित करणें हेंच खरें कलेचें कार्य ! कला अगदीं सहजपणें निर्मित होते. कला ही सहजस्फूर्त आहे. ज्याक्षणीं ती स्फुरेल त्याक्षणीं ती सहजासहजीं निर्माण होईल, आणि आपल्या आस्तित्वानें पाहाणारांना स्तिमित करून सोडील. कला ही कलावंताचें पोटभरू साधन नाहीं, तर त्यांच्या आशा-आकांक्षांची, मनोराज्यांची, कल्पनांची स्पष्ट जाणीव करून देणारी प्रकृति आहे. दुःखी जीवाला अधिक शांत करणारी तर आनंदी जीवाला अधिक हंसविणारी कृति म्हणजे खरी कला. कला ही आत्म्याच्या विकासासाठीं, रंजनासाठीं आणि प्रतीतीसाठींच आहे ! 'कलेनें जगाला वेड लावलें आहे तर वेड्यांनींच खरी कलानिर्मिति केली आहे.' पण हें वेड—कलानिर्मितीचें वेड—अंगजात जन्मजात असावं लागतं. उगाच वेडं व्हायचं आहे असं ठरविल्यानें वेड होतां

येणार नाहीं आणि कला निर्मितां येणार नाहीं. एक पुरुषनिष्ठ पतिव्रतेप्रमाणेंच कलासुद्धां व्यक्तिनिष्ठच आहे.

* * *

" कां रे, कां आलास असा मध्येंच ? "

" तिला न्यायला. "

" म्हणजे ? "

" अरे दोन तीन पत्रं पाठवूनही ती येईना म्हणून प्रत्यक्षच आलों झालं. "

" अस्सं ? बरीच ओढ लागलेली दिसते. "

" कांहीं तरीच !--आश्चर्य असं, कीं मी इथं यायला आणि तिनं निघायला एकच गांठ पडली बघ ! बरं तें बरं, नाहींतर चुकामुकच झाली असती.— "

गुणवंत आपल्या पत्नीला--इंदूला--न्यायला आला होता. आणि त्याच दिवशीं जाण्यापूर्वी तो प्रकाशला भेटायला स्टुडिओंत आला होता.

" राहाणार ना दोन दिवस ? "

" छे रे, आतां रात्रींच निघणार ! आणि तेंही पण तुला घेऊन ! "

" मला घेऊन ? छे, आज निघायला सवड नाहीं मला. एका लक्षाधिशाची तसबीर तयार करायची आहे. उद्यांचा तर वायदा

आहे. आणि अजून निम्मं कामसुद्धां पुरं झालं नाहीं. दोन दिवस राहाशील तर येईन. ”

“ राहायला सवड नाहीं. आज जायलाच हवं ! तुझं काम पुरं झाल्यावर येशील तूं ? वचन दे तसं—” आणि गुणवंतानें खरेंच त्याच्यापासून वचन घेतलें.

प्रकाशनें त्याला आपली कला दाखवली. त्यालाही फार आनंद वाटला तें सारें पाहून.

आणि जातांना गुणवंतानें प्रकाशपासून “ ओढ ” चित्र मागून घेतलें. त्याला तें फार आवडलें.

प्रकाशनेंही ‘ आठवणीला काळ नको ’ म्हणून त्याला तें देऊन टाकलें.

* * *

# प्रकरण १९ वें

**बंधन— ?**

गुणवंताच्या घरीं इंदुमतीला पाहिल्याबरोबर प्रकाश एकदम थक्कच झाला. इंदुमतीची तर अवस्था जवळजवळ मूढच झाली. जिच्यावर आपण प्रेम केलं, पण केवळ तिची प्रतारणा करूं नये या सद्धेतूनं जिच्याजवळ आपण आपलं प्रेम व्यक्तविलं नाहीं ती आपली प्रेममूर्ती प्रत्यक्ष समोर उभी आणि तीही आपल्या मित्राच्या घरीं—मित्राची पत्नी या नात्यानें; मग असं असतांना प्रकाशला कां नाहीं धक्का बसणार ?

मोठ्या कष्टानें दोघांनींही आपली मनःस्थिती आवरली. प्रकाशला पाहून गुणवंताला आनंद झाला हें खरें, पण तो आनंद फार काळ टिकला नाहीं. कारण त्याचा आनंद टिकावा अगर द्विगुणित व्हावा

अशी एकही कृति प्रकाशच्या हातून घडली नाहीं. घडून येणें शक्यच नव्हतें मुळीं !

जास्त वेळ तिथं राहाणं नकोसं वाटलं प्रकाशला ! दुसऱ्याच दिवशीं परत जाण्याचा त्यानें निर्धार केला आणि बोलूनही दाखवला. गुणवंतानें खूप आग्रह केला, पण त्यानें निश्चय न बदलण्याचा निर्धार केला.

इंदुमतीला प्रकाश उद्यांच जाणार हें कळलें. तिला राहवेना. प्रेम हें जितकं मधुर तितकंच जहरीही आहे. प्रेम हें एकनिष्ठ आहे, तें एकावर आणि एकदांच केलें जातें. दुसऱ्या व्यक्तीवर आणि तेंही दुसऱ्या खेपेस प्रेम जडणें शक्य नाहीं. इंदूचें प्रेम प्रकाशवर होतें. फार दिवसांनीं इंदूला प्रकाश दिसला होता. तो लागलीच दूरावला जावा आपल्यापासून असं तिला वाटेना. बरं तो राहावा असंही वाटेना. राहिलाच तर कदाचित् सहवासाच्या सततत्तेनें अनिष्ट परिणाम घडून येण्याचा संभव; न राहावा तर विरहाच्या वेदना ! प्रकाश भेटला नसता तर इंदूला विशेष असं कांहीं वाटलं नसतं, पण त्याच्या पुनरपी झालेल्या दर्शनानें तिच्या मनांतले सारे भाव पुन्हां उफाळून वर आले, त्रस्तवूं लागले; असह्यता वाढली ! आणि अखेर त्याचेंच पर्यवसान त्याला ठेवून घेण्यांत झालें.

जेवतांना गुणवंताला—आपल्या पतीला उद्देशून इंदू म्हणाली— "उद्यांच जाणार काय पाहुणे ? बरेच दिवसांनीं आले आहेत, मग राहीनात दोनचार दिवस !"

डाव मोठ्या सफाईनें टाकला इंदूनें. आणि तिचा उद्देश सफलही झाला.

तिच्या उच्चाराचा प्रकाशच्या मनावर परिणाम झाला. त्यामुळें त्यालाही राहावेंसें वाटूं लागलें.

" राहीनास रे आणखी दोनतीन दिवस ! " गुणवंत म्हणाला.

आणि या गुणवंताच्या दुजोऱ्यानें तर प्रकाशनें खरोखरीच आपलें आसन आणखी तीन चार दिवस ठोकायचें ठरविलें.

* * *

" प्रकाश—

काय लिहूं तुम्हांला मी ? माझ्या मनाची मोठी दोलाचल स्थिति झाली आहे पहा. प्रकाश, आपली ओळख झाल्यापासून आणि ती दृढावली तेव्हांपासूनच माझं आपणांवर प्रेम बसलं. तें अद्यापपावेतों तसंच आहे. मी बोलून दाखवलं नाहीं ही चूक झाली माझी; नाहीं का ? खरंच मी मनदुबळी आहे प्रकाश ! माझ्या या मनोदौर्बल्याचें—' भीति, साहजिक प्रवृत्ति, उपजतबुद्धि, अबला, नैसर्गिक शालीनता,—' काय वाटेल त्या शब्दसमूहानं समर्थन करतां येईल. पण खरं सांगूं का प्रकाश, या साऱ्या भावना प्रीतीच्या चैतन्यवह्नींत नामशेष झाल्या पाहिजेत. आणि असं झालं तरच ती खरी प्रीति. आपल्यावरील प्रीतीच्या अविश्वासामुळें, माझ्या आत्मविश्वासाच्या अभावामुळें मी कचरलें त्यावेळीं. धैर्य झालं नाहीं मला त्यावेळीं आपणांला विचारायला ! पण जें त्यावेळीं झालं नाहीं तेंच आज माझ्या मनाला त्रस्तवीत अन् व्यग्रवीत आहे. प्रकाश, काय सांगूं अन् कसं सांगूं तुम्हांला, कीं माझं तुमच्यावर प्रेम होतं अन् आहे म्हणून ! दिगंत आवाज ऐकूं जाईल अशा मोठ्यानें ' प्रकाश,

प्रकाश, प्रकाश' म्हणून ओरडूं का ? ऊर गुदमरून गुदमरून गेला आहे; जीव अगदीं कासावीस झाला आहे. तळमळ व्हायला लागली आहे मनाला. माझ्या या वृत्तीमुळें मी कामुकच आहे असं वाटेल; पण ज्यांना असं वाटेल त्यांना प्रेमाचा खरा अर्थच कळला नाहीं असं मी म्हणेन ! मानवी हृदयांत वास करणाऱ्या प्रेम व विषयवासना या दोन भावना सर्वस्वीं भिन्न स्वरूपाच्या आहेत हें ओळखायला हवें. अंतःकरणांत प्रेमाचा लवलेशही नसतां कामुकतेची तीव्रता असह्य होतेच कीं नाहीं ? काम आणि प्रेम यांत भिन्नता आहे असंच मला वाटतं. प्रेमभावना स्थिर असून ती सर्वकाळ उदात्त राहणारी आहे. उलट कामभावना अत्यंत चंचल, अस्थिर आणि उपभोगात्मक आहे. या दोन्हींतील भिन्नता ओळखायला हवी. कामुकता, प्रीतीचं एक छायांग असेल. पण कामुकता म्हणजेच प्रीति हें खरें नव्हे. आणि म्हणूनच, आपल्यावरील प्रीति प्रकर्षाला पोहोंचली असूनही मी कामुक नाहीं असं म्हणते आहे.

प्रकाश, तुम्ही माझ्याजवळ आहांत, पण जवळ असूनही किती दूर—दूर—आहांत तुम्ही ! अगदीं हजारों कोस—अनंत योजनांच्या अंतरावर तुम्ही आहांतसं वाटतं. कशामुळें हें अंतर दूरावलं ? लग्नामुळें ! माझं लग्न झालं नसतं तर प्रकाश, तुमच्या गळ्याला मिठी मारून, तुम्हाला गाढ आलिंगून ही असह्यता शमवली असती मी ! प्रकाश, खरंच जाणार कां तुम्ही उद्यां ? जा, जा, खुशाल जा तुम्ही ! पण जाण्यापूर्वी माझी—या अभागिनीची—एकच इच्छा पुरी करून जा ! तुमच्याजवळ सुरी—चाकू कांहीं

असेल ना, तिचा प्रहार या माझ्या गळयावर करा अन् मग खुशाल निघून जा! पण तसं करतांना 'माझी इंदु—इंदू, तूं माझी आहेस' असं प्रेमभरानं म्हणायला विसरूं नका, आणि या शरिरांतून प्राण निघून गेल्यावर या मृतमुखाचें चुंबन घेतल्याविना राहूं नका! काय अघोर मागणं मागितलं हें मी, असं वाटेल नाहीं तुम्हांला? पण तें न लाभलेल्या सौभाग्याचं मागणं आहे प्रकाश! पुरी कराल ना माझी ही इच्छा?

तुमचीच
(न झालेली, पण असलेली)
**इंदुमती.**"

* * *

"प्रिय प्रकाश—

माझं हें दुसरं पत्र पाहून आपल्या मनाला काय वाटेल? कांहींही वाटो! माझ्या मनाचा जो निर्धार झाला आहे तो मी खुलेपणानें व्यक्तविणार आहे. होय म्हटलंत तर ठीकच आहे. 'नाहीं' म्हटलंत तर? तर—पण कशाला वाच्यता करूं त्याची इतक्यांतच? उत्तर दिल्याशिवाय मात्र राहूं नका एवढीच कळकळीची विनंति.

परस्परांची एकमेकांवर प्रीति जडणं हें कदाचित् दैवाधीन असूं शकेल, पण प्रीति जडल्यानंतर त्यांची पूर्तता करून घेणं हें सर्वस्वीं आपल्याच स्वाधीनचें आहे. अंतःकरणांतून भीति नाहींशी झाली पाहिजे, आणि निर्माण होणाऱ्या कुठल्याही प्रतिकूल परिस्थितींचा प्रतिकार करण्याची शक्ति दृढावली पाहिजे. प्रीति

आणि भीति यांचा एकत्र वास अशक्य आहे. माझ्या अंतःकरणांतील भीतीचा लोप झाला आहे. आपल्यावरील आकर्षण द्विगुणित झालें आहे. तें आकर्षण क्षणिक स्वरूपाचें नाहीं, त्यांत शाश्वत सत्याचा—पावित्र्याचा अंश अधिक आहे याची जाणीव झाली आहे माझ्या मनाला. माझ्या दृष्टीनें माझे खरे पती आपणच आहांत. लौकिकाचाराच्या दृष्टीनें गुणवंतराव माझे पती असतील, पण माझ्या मनाच्या साम्राज्यांत लौकिकाचाराला किम्मत नाहीं. लौकिकाचार, प्रचलित नीति—धर्म—संस्कृति म्हणजे केंविलवाण्या दौर्बल्यावर जाणूनबुजून घातलं जाणारं घाणेरडं पांघरूणच ठरेल ! प्रचलित रूढ नीतिनियमांना भिऊन जीवन कंठणारें व प्रीतीला पायांखालीं तुडवणारें मन अत्यंत हिडिस आहे असें मी समजतें.

अगदीं उघडपणें—चोरून नव्हे—सांगून सवरून मी उघड उघड आपला हात धरायला तयार आहे. बोला, प्रकाश, बोला—तुमची तयारी आहे का ? स्पष्ट, स्पष्ट सांगा काय तें ! सामाजिक निर्बंधांचा बाऊ तुम्हांला भेवडावीत असेल तर ती घातुक भीति मनांतून काढून टाका. आपल्या हृत्संकेतानुसार जीवन व्यतीत करणं ज्या क्षणीं अशक्य होईल त्या क्षणीं हीं सारीं बंधनं तोडायला तयार झालं पाहिजे.

तुमचीच

नाहीं कां ? आहेच मी तुमची-

**इंदुमती.**

* * *



# प्रकरण २० वें

## बंधन तोडलें !

ज्यावेळीं शक्य होण्यासारखं होतं, त्यावेळीं भलत्याच भरीला पडून, इंदुमतीवर प्रेम बसलं आहे हें कळलं असूनही तिच्याशीं विवाह करून घेतला नाहीं. आणि आजपर्यंत जिच्या सहवासाला पारखा झाला—त्या इंदुमतीच्या साहचर्यात आज आठ दिवस झाले प्रकाश आपला काळ कंठूं लागला होता. ज्यावेळीं आपलं इंदुमतीवर प्रेम बसलं आहे असं प्रकाशला कळून आलं, त्या वेळेपासूनच इंदुमतीशीं सहवास घडून यावा अशी त्याच्या मनाला हांव लागली होती. परंतु ती त्यानें स्वतःच दडपून ठेवली आणि तिच्या सहवासाला तो अंतरला. मध्यंतरीं तिचें दर्शनही दुर्लभ झालें होतें हें खरें, पण म्हणून तो तिला विसरूनही गेला नाहीं. जितका विरह जास्त तितकें प्रेम दृढावतें जास्त हें खरें आहे. 'जितकें दूर

तितकेंच निकट' हेंच तत्त्वार्थानें खरें आहे. इंदुमतीपासून तो शरीरानें दूरावला होता, पण त्याचें मन तिच्यापासून दूरावलें नव्हतें. तर उलट तें जास्तच तिच्याठायीं रत झालें होतें.

फारां दिवसांनीं प्रकाश–इंदू एकेठिकाणीं आले होते. साहजिकच त्यांच्या ठायींच्या मनोभावना–वेदना दृढावणें शक्य आहे. आणि तसेंच झालें.

इंदुमतीच्या सहवासाला आजपर्यंत हपापलेला प्रकाश—आज आतां तिच्या स्पर्शसुखासाठीं तो हपापला होता. मनुष्याच्या मनाची घडणच अशी आहे. त्याच्या हळूहळू आकांक्षा वाढतच असतात. एक मिळत नाहीं तोंपर्यंत तो त्यासाठीं हापापूं लागतो. एक मिळालं म्हणून तो संतुष्ट होत नाहीं. त्याला समाधान वाटत नाहीं, दुसऱ्यासाठीं तो तळमळूं लागतो. दुसऱ्यानंतर तिसऱ्यासाठीं, त्यानंतर चौथ्यासाठीं—अशा त्याच्या आकांक्षा प्रत्यहीं वाढत असतात. मनुष्य प्राणी समाधानी कधींच दिसणार नाहीं.

हीच अवस्था प्रकाशची झाली. केवळ नुसत्या सहवासाला हपापलेल्या प्रकाशला, सहवासाची प्राप्ती झाल्यानंतर आतां स्पर्शाची हांव वाटूं लागली. आणि तें साहजिकच होतें.

पण आपली ही मनोव्यथा प्रकाश विवेकानें दडवून ठेवूं लागला. तसं करतांना त्याला मनस्वी दुःख होई हें खरें, पण तें सहन करण्याविना गत्यंतर नव्हतें.

सतत चोवीस तास तीं दोघें एकमेकांच्या सान्निध्यांत राहायचीं.

सकाळीं चहा घेतांना इंदू, स्नान करतांना इंदू, जेवतांना इंदू, दुपारीं चहा घेतांना इंदू, सायंकाळीं फिरायला जातांना इंदू, फिरून आल्यावर इंदू, जेवतांना इंदू,—

इंदू, इंदू, इंदू ! ! !

अशी सतत इंदू त्याच्या दृष्टीसमोर उभी राहूं लागली. प्रेमिकांच्या सान्निध्यांत राहून वियोगावस्थेचा दारुण अनुभव घ्यायचा यासारखं दुःख नाहीं दुसरं कोणतंही ! पंचपक्वान्नांनीं भरलेलं ताट समोर असतांना, क्षुधा असूनही त्याला हात लावायचा नाहीं; प्रखर उन्हाच्या रखरखीनें तृषाव्याप्त झाल्यावेळीं, झुळझुळू वाहणाऱ्या झऱ्याच्या स्वच्छ–शुभ्र पाण्याचें पान करावयाचें नाहीं— अशा वेळीं कशा विलक्षण वेदना मनाला होत असतात, तशाच वेदना सहवासोद्भव वियोगामुळें प्रकाशला—प्रकाशलाच कां ?— इंदूलासुद्धां—होत होत्या.

घट्ट घट्ट कवटाळून हृदयाशीं धरावं, हनुवटीला हात लावून ती वर उचलावी आणि प्रेमभरानें अतृप्त नजरेनें सारखें तृप्ती होईपर्यंत नजरेला नजर भिडवून चेहऱ्याकडे पाहात राहावं असं दोघांनाही वाटत होतं. पण—पण ? ? ?

*　　*　　*

याच वळीं इंदूनें आपलीं दोन्हीं पत्रें प्रकाशला समक्षच आणून दिलीं. प्रकाशनें तीं पत्रें वाचलीं. त्याला तीं प्रमेयें पटलीं. पण त्याप्रमाणें वागायला त्याचें मन तयार होईना. त्या द्विपुटीला तो

धजेना. मीलनाला उत्सुक असूनही तो दूर-दूर राहाण्याचा प्रयत्न करूं लागला. आपल्या या वर्तणुकीचें समर्थन करतांना तो म्हणाला—

"आपलं दोघांचंही एकमेकांवर प्रेम आहे ही गोष्ट मला अक्षरशः कबूल आहे. पण या प्रेमाला आतां मित्र-मैत्रिण या संबंधाचें वा आणखी कसल्यातरी पवित्र संबंधाचें स्वरूप दिलें पाहिजे. प्रेमाला मीलनाची आवश्यकता आहेच असें कांहीं नव्हे, सहवासाची आवश्यकताही नाहीं, पण कां तें कळत नाहीं अथवा सांगतां येत नाहीं असं म्हण हवं तर! परंतु सहवास अन् तोही सतत सहवास असावा असं मात्र वाटतं. तुझ्याप्रमाणें मलाही वाटतं. तूं पत्रांत लिहिल्याप्रमाणें मीलनाची आकांक्षा दृढावते, परंतु ती आपण विवेकानें दडवावी हेंच उत्तम! अशावेळीं मनाला दुर्धर वेदना होतात. त्या सहन केल्या पाहिजेत. आपल्या प्रेमाला दुसरं कसलं स्वरूप देतां येणार नाहीं का?"

"येईल देतां! पण त्यांत ... ... मला सांगतां येत नाहीं काय तें! समीपतेची प्रेमाला आवश्यकता आहे. प्रेमाच्या सोपानपरंपरा चार आहेत. सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता! मग या अनुसरून पाहातां समीपता—निकट समीपता—थोडक्यांत मीलन जरूरीचें आहे. त्यानंतर सरूपता! आपल्या रूपाशीं माझें रूप तद्रूप झालें पाहिजे. माझ्या देहकोषांत आपला देहकोष मुरला पाहिजे—आणि त्याची अखेरता सायुज्यांत झाली पाहिजे असं मला वाटतं. प्रेम हें ऋजु आणि चारुतर आहे. कोणत्याही परिस्थितींत त्याची ऋजुता आणि चारुता नष्ट होत नाहीं. प्रेमाची अखंड ऋजुता या मीलनांत, समीपतेंत आणि सायुज्यांतच आहे—

मी लौकिकाचाराला जुमानीत नाहीं. मला—मला आपल्या—नाहीं, बोलवत नाहीं; आपण ओळखा मला काय बोलायचं आहे तें ! आणि नाहींपेक्षां—नाहींपेक्षां ? छे; हेंही मी न बोलून दाखविणंच इष्ट आहे.

‘प्रेमाच्या सफलतेच्या एका क्षणासाठीं प्रेमी स्त्री आपल्या जीविताची नासाडी करून घेते वेळप्रसंगीं.’ माडखोलकरांचे हे उद्गार खरे आहेत प्रकाश. प्रेमासाठींच या जगांत जगायचं असतं; जगाचा पसारा प्रेमाच्या जोरावरच चालला आहे. उत्पत्ति, स्थिति आणि लय या प्रत्येक चराचरांमागें प्रेमाच्या अवस्था लागल्या आहेत. प्रेम करावं, प्रेमानें वागावें, आणि त्यांतच समाधान मानून आयुष्याचा व्यय करीत राहावें. उगाच नाहीं टेनिसननें म्हटलें—

“ 'Tis better to have loved and lost,
Than never to have loved at all.—”

आणि असें म्हणून तिनें–इंदुमतीनें–आपले दोन्ही हात प्रकाशच्या गळ्यांत घातले, व ती त्याला जास्तच बिलगली.

हा क्षण फार आणीबाणीचा होता.

मोठमोठ्या तपस्वींच्या मनोबलाच्या ठिकऱ्या याच क्षणामुळें उडाल्या आहेत. याच क्षणामुळें मेधावींच्या बुद्धीचा अधःपात घडून आला आहे. मग प्रकाश कांहीं यांपेक्षां उच्च कोटींतील नव्हता खास.

तिचा तो मधुर–मनोज्ञ पाश सोडवावा असं प्रकाशला फार फार वाटलं, पण तसं करण्याइतका तो समर्थ नव्हता आतां. त्याच्या

साऱ्या वृत्ति तिच्या शरीराच्या स्पर्शानं मंहिरून धुंद झाल्या होत्या, सर्वांगावर रोमांच तरळले होते—आणि त्या बेभान अवस्थेंत त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत घट्ट कवटाळली.

त्या क्षणीं प्रकृतीचा विजय झाला—

नीतीचीं सारीं बंधनं परिस्थितीमुळें तुटलीं.

ते दोन भिन्न जीव अभिन्न झाले.

ती दोन भिन्न जीवांची अभिन्न द्विपुटी होती.

*　　*　　*

## प्रकरण २१ वें

### गुणवंत गेला !

श्री. रा. रा. गुणवंतराव यांसी

सा. न. वि. वि.

कळविण्यास आनंद वाटतो, कीं आपली पत्नी चि. सौ. यमुना काल रोजीं सुखरूपपणें प्रसूत होऊन अपणांस तिनें पुत्ररत्नाचा लाभ दिला आहे. बाळ—बाळंतीण खुशाल आहेत. काळजी नसावी. मुलाचें नांव काय ठेवावें हें उलट टपालीं कळविणें, आणि बारशाला येण्याचें करावें ही विनंति. कळावें.

आपला

**भिकोबा.**

गुणवंताची प्रथम पत्नी, जी वेडी आणि बावळट होती, आणि जिला गुणवंतानें, तिच्या माहेराकडील इस्टेट आपल्या नांवें होऊं

शकत नाहीं म्हणून वैतागानें माहेरीं नेऊन सोडलें होतें–त्या गुणवंताच्या पहिल्या पत्नीच्या चुलत्याकडून हें पत्र आलें होतें. गुणवंताचें माथें हें पत्र वाचून भडकलें. पत्नीच्या माहेराहून पत्नीला बक्षीस मिळालेली इस्टेट आपल्या नांवें होत नाहीं म्हणून आपण जिचा त्याग केला, त्या आपल्या परित्यक्त पत्नीला मुलगा व्हावा; आणि तोही आपल्या पश्चात् ! मग कां नाहीं गुणवंताला वाईट वाटणार ? पण खरी गोष्ट अशी होती—

गुणवंत दुसरं लग्न करून घेणार हें ज्यावेळीं गुणवंताच्या प्रथम पत्नीला व तिच्या चुलत्याला कळलं, त्यावेळींच त्यांनीं गुणवंताला पत्र पाठवून त्याबद्दलच्या सत्यासत्यतेची खात्री करून घेतली. गुणवंतानें पत्राला उत्तरच लिहिलें नाहीं. मात्र कुणी चौकशीला आलाच तर त्याला आहे ती खरी हकीकत सांगायला तो कचरत नसे. साहजिकच तिच्या चुलत्याला ती बातमी खरी असल्याचें कळलें. त्यानंतर त्यानें गुणवंताला, " आपण लग्न करून घेऊं नये. पहिल्या पत्नीचा –माझ्या पुतणीचा–त्याग करून दुसरें लग्न केल्यास आपणांस तिच्या पोटगीची व्यवस्था पती या नात्यानें करावी लागेल. तेव्हां काय तें विचार करून ठरवा. " असें पत्र पाठविलें होतें. या पत्राला उत्तर म्हणून गुणवंतानें, " पोटगीची व्यवस्था मला कांहींही करण्याची जरूरी नाहीं. आपण तिच्या नांवें जी इस्टेट करून ठेवली आहे— कीं जी मी माझ्या नांवें व्हावी अशी खटपट केली होती, परंतु आपल्या प्रतिकारानें माझ्या नांवें होऊं शकली नाहीं—ती इस्टेट म्हणजेच—मी तिचा त्याग केल्यास तिच्या पोटगीची व्यवस्था

होय. आणि आपणच हें कोर्टांत सांगितलें आहे; व याही उपर जर आपणास यासंबंधानें अट्टाहास चालवावयाचा असेल, तर त्याला माझी पूर्ण तयारी आहे. " असें पत्र पाठविलें.

गुणवंताचा सासरा या पत्रानें चिडीला पेटला. परंतु आतां यापुढें पुन्हा कोर्टांत जावें हें त्याला रुचेना. अथवा रुचलें असूनही त्याला तसें करवेना असं म्हणा हवं तर !

पुराणांतरीं, नियोगानें संतति उत्पन्न केल्याचें प्रसिद्धच आहे. सत्यवतीला तर कौमार्यावस्थेंतच पुत्र झाला होता. शिवाय ती तर कोळ्याची मुलगी. आणि आपला वंशक्षय होऊं नये म्हणून तिनेंच आपल्या सुना अंबा—अंबालिका यांना त्यांच्या दिराशीं—म्हणजे आपल्या पुत्राशीं—अभिसाराला प्रवृत्त केलें होतें ही कथा प्रसिद्ध आहे. तसेंच, पंडूनेंही वंशक्षय होऊं नये म्हणून आपल्या पत्नीस—कुंतीस—पुत्रप्राप्तीसाठीं अभिसाराला प्रवृत्त केलें होतें हीही कथा प्रसिद्धच आहे. सत्यवतीनें आपल्या सुनांना अभिसाराला प्रवृत्त करतांना, निवडावयाचा पुरुष योग्य तरी निवडला होता. म्हणजे आपल्याच रक्तापासून झालेला असा पुरुष—अथवा त्यांचाच दीर ! पण पंडूनें याकडेही लक्ष दिलें नाहीं, तर सर्वस्वीं कुंतीच्या इच्छेवर आणि आवडीवरच सोंपविलें. आणि तिनेंही आपणांला मिळालेल्या वरप्रसादाच्या शक्तीनें कांहीं देवांना पाचारण करून पतीची इच्छा पुरी केली. वंशक्षय होऊं नये, पुत्रप्राप्ती व्हावी यास्तव पंडूनें जी इच्छा व्यक्त केली, ती त्याची इच्छा एका पुत्ररत्नानें पुरी झाली हें खरें. बरें, त्यानंतर पुन्हां पुत्रप्राप्ती व्हावी अशी इच्छा व्यक्त

करणें अथवा तेवढ्यासाठीं कुंतीला प्रवृत्त करणें म्हणजे एकप्रकारें अधर्माप्रमाणें वर्तन करणें नव्हे का? पुत्र होत नसल्यास नियोगानें संतति उत्पन्न करणें ही धर्मानें सवलत ठेवली हें खरें; पण म्हणून या सवलतीचा फायदा भाराभर संतति उत्पन्न करणें असा जर घ्यावयाचा, तर तें कशाचें द्योतक म्हणावें कळत नाहीं. कुंतीला तीन पुत्र झाले, हें एक वेळ सर्वस्वीं आवश्यकच म्हणून पंडूनें प्रवृत्त केलें असेल. आणि एवढ्यावर तो संतुष्टसुद्धां राहिला असेल; पण कुंतीला मुलें झालींच, मग '**आपणांला कां नको**?' असा सवाल तिच्या सवतीनें टाकतांच तिलाही अभिसाराला प्रवृत्त होण्यास परवानगी पंडूनें द्यावी हें तरी कशाचें द्योतक तेंही कळत नाहीं! असो. तूर्त आपणांला या आडमार्गांत शिरावयाचें नाहीं आणि व्यर्थ काथ्याकूटही करावयाचा नाहीं.

गुणवंताच्या प्रथम पत्नीच्या चुलत्यानेंदेखील, आपण बक्षीस दिलेली आपली इस्टेट आपल्या पुतणीच्या पश्चात् असल्या स्वार्थी इसमाकडे जाऊं नये व तिचा उपभोग त्याला घेतां येऊं नये, तर ती आपल्या पुतणीच्या पुत्राला तिच्या पश्चात् मिळावी अशी इच्छा मनीं बाळगली. पण हें तर होणें बहुधा अशक्यच; कारण गुणवंतानें तिचा त्याग केला होता. मग? मग काय? त्यानें, तिला नियोगानें संतति व्हावी यासाठीं अभिसाराला प्रवृत्त केलें. तीही अभिसारिका बनली.

गुणवंताची प्रथमपत्नी कांहींशी वेडी अन् बावळट खरी, पण आपला स्वार्थ आणि सुखही न कळण्याइतकी ती दुधखुळी खास नाहीं.

साहजिकच, स्वतःच्या सुखासाठी म्हणा,–क्षणैक सुखासाठीं–म्हणा, चुलत्याच्या इच्छेला मान तुकविण्यासाठीं म्हणा-कशासाठींहीं म्हणा–ती अभिसारिका बनली. आडमार्गी कृत्याच्या आहारीं गेली.

* * *

गुणवंताचें माथें भडकलें ही गोष्ट खरी. पण झाली गोष्ट होऊन गेली होती. आतां त्याचा कांहीं उपयोग नव्हता. त्याच्या वैवाहिक जीवनाचा खेळखंडोबा व्हायचा तोच झाला.

आपण स्वतः कितीही व्यभिचार केला, तरी त्यासंबंधानें विचारच करावयाचा नाहीं, आणि आपल्या बायकांनीं मात्र अंशमात्रही व्यभिचार केलेला खपावयाचा नाहीं अशीच पुरुषांच्या मनाची ठेवण असते कीं काय नकळे! गुणवंताच्या मनाची मात्र अशी स्थिति झाली. त्याला कांहीं सुचेना. तो अगदीं दिङ्मूढ होऊन गेला. स्वतः पूर्वायुष्यांत आपण काय केलें हें त्याच्या लक्षांतही येईना; पण तेंच आपल्या प्रथम पत्नीनें हें असें कां करावें यासंबंधींच्या विचारानेंच तो त्रस्तला होता. आपल्या मनाची ही त्रस्तता अन् व्यग्रता घालविण्यासाठीं विरंगुळा वाटावा म्हणून अलिकडे तो एकटाच लांब लांब फिरायला जाई, एकटाच सिनेमा–नाटकाला जाई! त्यांत त्याला करमतच असे असं कांहीं नव्हे, पण त्याच्या, विचार करून करून श्रांत झालेल्या मनाला तेवढीच विश्रांति मिळाल्यासारखें होई.

आजही असाच तो एका सिनेमाला गेला होता. सिनेमाहून परत आला त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. दार लावलें होतें. दार

उघडलें जावें म्हणून कडीवर थाप मारण्यासाठीं त्यानें हात उचलला, तोंच त्याला इंदु-प्रकाश यांचा पुढील संवाद ऐकूं आला.—

"गोष्ट खरी; पण आतां यापुढें या साऱ्या गोष्टी लपवून-छपवून ठेवाव्यांत हें मला पसंत नाहीं. जें काय व्हायचं असेल तें होवो. सारं कांहीं खुलेपणानें त्यांना सांगून टाकायचं असं मीं ठरविलं आहे. लोकांच्या दृष्टीनें ते माझे पति आहेत, पण मी त्यांच्याकडे बंधूच्या नात्यानें पाहात्यें आहें, आणि पाहात राहाणार. त्यांच्याशीं पत्नीच्या नात्यानें राहायला मला नको वाटतं. माझ्या मनाची तयारीच होत नाही. कां तेंच कळत नाहीं. पण हें असं होतं आहे खरं! आपल्या जाणत्या वयांत स्त्री प्रथम ज्या पुरुषाकडे प्रेमभरानें पाहील, त्याच पुरुषाविषयींची तिची अभिलाषा मरेपर्यंत कायम राहील, व तेवढ्याच्या प्राप्तीस्तव ती अहोरात्र श्रांतेल, खटपटेल, झुरेल. वेळप्रसंगीं कसल्याही अघोर साहसाला तयार होईल. आपणांवर माझं प्रथमपासूनच प्रेम बसलं आहे. तें केव्हांही नष्ट होणार नाहीं. आणि तें छपविण्याचा मी प्रयत्नही करणार नाहीं. कांहीं स्त्रिया, त्यांच्या आयुष्यांत अशा कांहीं गोष्टी घडत असल्यास त्या छपविण्याचा प्रयत्न करतात, हें मला माहित आहे; पण मला तसं करावयाचं नाहीं. मी जें करीन तें उघड उघड करीन. **मनःप्रेरणेनुसार वागेन ! आणि अशी वर्तणूक ठेवल्यासच मानवजातीच्या प्रगतीला खराखुरा आरंभ होईल अशी माझी मनोदेवता मला ग्वाही देते आहे.** पण "**मनःपूतं समाचरेत्**"—याचा अर्थ, सरसकट वाटेल तसं वागेन, चोरी करण्याची इच्छा ज्या ज्या वेळीं होईल

त्या त्या वेळीं मी चोरी करीन, अनिष्ट गोष्टी करण्याची प्रवृत्ति ज्या ज्या वेळीं होईल त्या त्या वेळीं मी त्या करीन असा केव्हांही घ्यावयाचा नाहीं. सारासार विचार करून अंतीं जें योग्य दिसेल तें करावें, आणि याचाच अर्थ "**मनःपूतं समाचरेत्**" असा घ्यावा असं मला वाटतं. आपल्यावर प्रेम असतांना, आपल्या विषयींची अभिलाषा माझ्या मनांत सतत जागृत असतांना आणि गुणवंतरावांविषयीं माझ्या मनांत किमपिही प्रेम नसतां, त्यांच्या-विषयीं माझ्या मनांत अणुमात्र अभिलाषा नसतांना ती आहे असें दाखविणें व त्यांची तशी, आणि खऱ्या प्रेमाची ही अशी प्रतारणा करणें हें माझ्या सरळ आणि निर्मळ मनाला रुचत नाहीं. मग या कृत्यांत कोणी मला अनीतीनें वागणारी म्हणो वा कांहीं म्हणो. आणि नाहीं तरी नीति–अनीतीच्या मर्यादा आतां बदलल्याच पाहिजेत. जें गुणवंतरावांनीं केलं तें मी करतें आहे. त्यांनीं लपून छपून केलं, मी उघड उघड करतें आहे. हाच आम्हांतील फरक ! रूढ नीतिनियमांनुसार पाहिल्यास ते माझे पती असतील, पण अंतःप्रेरणेच्या कसोटीवर घांसून पाहिल्यास ते माझे खरे पती नसून, माझ्या मृत ताईचे–मीनाक्षीचे पती आहेत, आणि आपणच माझे पती आहांत, हेंच दिसून येईल. केवळ प्रचलित रूढ नीतीच्या रक्षणासाठीं प्रतारणेनें त्यांच्याशीं, जीवन कंठणें मला केव्हांही सुखावह होणार नाहीं. मलाच काय, असं जीवन कुणालाही कंठतां येणार नाहीं. तेव्हां, **आतां प्रचलित रूढ नीतिनियमांत जरूर ती सुधारणा अवश्य केली जावी ही पहिली मागणी ! आपण**

**मानवांनींच आपल्या सुखासाठीं व स्थैर्यासाठीं नीतीचे नियम ठरवले आहेत. आतां आपल्यालाच तिच्यांतल्या एकांगीपणाचा, आपल्या सुखासाठीं अन् स्थैर्यासाठीं त्याग केला पाहिजे. आणि जरूर ती व इष्ट असेल ती सुधारणा घडवून आणली पाहिजे. तसं करणं प्रथम दर्शनीं सुखावह नसतं हें मी जाणून आहे. पण तेवढ्यासाठीं–प्रचलित रूढ अनिष्ट नीतिनियमांच्या फाजील संरक्षणास्तव अखिल मानवजातीची प्रगति खुंटवणं व तिला ठराविक चाकोरींत डांबून नेस्तनाबूद करणं हें अत्यंत हिडिसपणाचं आहे. या अनिष्ट रूढींची पायमल्ली करण्यास कोणी तरी धैर्यानं पुढं आलंच पाहिजे.—"**

इंदूचें हें बोलणें गुणवंतानें बाहेरच उभें राहून ऐकलें. व त्याच्या विचाराला उलट गति मिळाली. आणि तो बाहेरूनच बोलला— "खरं आहे तुझं इंदू ! तसं करण्यासाठीं आतां आपण तिघेही धैर्यानें पुढं येऊं या ! प्रसंगीं, समाजानें आपणां तिघांचाही बळी घेतला तरी बेहत्तर ! तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी खरोखरीच तुझा पती नाहीं. प्रकाश अन् तूं, दोघेही एकत्र राहा. इष्ट त्या सुधारणेची आवश्यकता किती आहे हें स्वतःच्या उदाहरणानें तुम्ही समाजाला पटवून द्या ! तुमच्या मार्गांत माझा व्यत्यय नको. हा मी चाललों—दूर–दूर— चाललों—कांहीं तरी समाजाची सेवा करण्यासाठीं चाललों."

आणि असं म्हणून तो निघूनही गेला.

**गुणवंत गेला !**

दरवाजा उघडून इंदूनें त्याला खूप हांका मारल्या. पण हा वेळेपर्यंत तो किती तरी दूर गेला होता.

* * * *

आज गुणवंत, कोकणांतल्या एका खेड्यांत दलितवर्गाला साक्षरतेचे धडे देण्यांत आपलें शेषायुष्य व्यतीत करीत आहे.

* * * *



## प्रकरण २२ वें

### मी रखेली ?

इंदुमती झोपली होती. शेजारींच आरामखुर्चीवर बसून प्रकाश पुस्तक वाचीत होता. तोंच इंदुमती बरळत बरळत दचकून उठली. तिला स्वप्न पडलं होतं.

एक मोठी थोरली चिता पेटली आहे. ज्वाळा भडकल्या आहेत. तिला भिऊन आपण दूर दूर पळून जात आहोंत, पण तिथं जमलेला जनसमूह आपल्याला पळून जाऊं देईना. उलट हातांतल्या काठ्यांनीं आपल्याला सारखें मारीत आहेत व " तूं–तूं–प्रकाशची रखेली आहेस—हो; तूं प्रकाशची रखेली आहेस..." असें ओरडून जो तो आपल्याला त्या पेटत्या चितेंत ढकलीत आहे.

असं तें स्वप्न होतं. ती उठली.—" नाहीं, मी रखेली नाहीं; प्रकाशांची पत्नी आहे. रखेली नाहीं, प्रकाशांची पत्नी आहे—" असें ओरडतच उठली.

ती शुद्धीवर आली. तिनें प्रकाशला पाहिलं आणि तत्क्षणीं तिनें प्रकाशच्या गळ्याला मिठी मारून प्रकाशला विचारलं—" प्रकाश, तुम्हीसुद्धां मला आपली रखेलीच म्हणणार का ? सांगा, प्रकाश सांगा, मला तुमचं पत्नीपद् लाभणार नाहीं का ?"

" पण मग, तुला हें लग्नापूर्वीच का नाहीं सुचलं ? म्हणजे ही केंविलवाणी वंचना तरी टळली असती!" प्रकाश म्हणाला.

" त्यावेळीं प्रीतीवरील माझा विश्वास दृढावला नव्हता, आत्मविश्वासाची जाणीव झाली नव्हती. ती ज्याक्षणीं झाली, त्याक्षणीं भोंवतालच्या साऱ्या साऱ्या बंधनांना तडातड तोडून मी प्रीतीकडे धांव घेतली आहे." आणि असं म्हणून त्याला ती अधिकच बिलगली.

पण तिचा तो मधुर—मनोज्ञ पाश सोडवीत प्रकाश म्हणाला "बरं केलं नाहींस तूं हें इंदु ! गुणवंताच्या आयुष्यावर जाणून बुजून निखारे ठेवलेस या योगानें तूं ! वैवाहिक जीवनाची खरी सफलता भोगांत नसून संयमांत आहे, स्वार्थांत नसून त्यागांत आहे, हें तुझ्यी सुज्ञ मनाला जाणवायला हवं होतं. —"

आणि तो दूर—दूर—झाला तिच्यापासून.

* * * *

